केशव कोठावळे प्रकाशन

ल लि त सा हि त्य – ५

# सीताराम एकनाथ

व्यंकटेश माडगूळकर

1951



मॅ जे स्टि क बु क स्टॉ ल

गि र गां व ना का, मुं ब ई ४.

मूल्य तीन रुपये



प्रथमावृत्ति
दीपावलि
१९५१



सजावट
दलाल



प्रकाशक
केशव कोटावळे
मॅजेस्टिक बुक स्टॉल
गिरगाव नाका, मुंबई ४.



मुद्रक
गणेश बैंदूर
जय गुजरात प्रेस,
गांवदेवी, मुंबई ७.

शाळा

दादा

तात्या

काका

कालगति

काकींच्या पाटल्या

तूं माझी पक्षिणी

अमीनची चित्तरकथा

जुगार

दीर-भावजय

भानाचं भूत

सीताराम एकनाथ

# शाळा

दुपार झाली. शाळेसमोर बांधलेली पितळी घंटा एका पोरानें लाकडी ठोकळ्यानें बडवली. तिचा घणघणाट साऱ्या खेड्यांत ऐकूं गेला.

लहानगा दिनू कुत्र्याशीं खेळत होता. शाळेची घंटा त्याला ऐकूं आलीच नाहीं.

पडवींत चौघडी अंथरून आई पडली होती. तिनें आवाज ऐकला आणि पडल्या-पडल्याच ती म्हणाली, " घंटा झाली बघ, दिनू, शाळेला जा ! "

तिला असें तीन-चार वेळां ओरडावें लागलें. आणि मग दिनू नाखुषीनें उठला. तंगड्या झाडीत आणि हात नाचवीत आईपुढें ओरडला, " माझी पाटी दे, पुस्तक दे आणि पेन्सिलसुद्धां ! "

आई उठली. लहान धाकटा आहे तोंवर तिला दिनूचें सारें करायला हवें होतें. शिकून शहाणा होऊन तोच पुढें आपल्या विधवा आईला सांभाळणार होता. सारा शीण फेडणार होता.

खिळ्याला अडकलेली पाटी, कोनाड्यांत पानें विस्कळित होऊन पडलेलें पुस्तक आणि पेन्सिल हें सारें साहित्य गोळा करून तिनें मुलाच्या हातीं दिलें. तें घेतांना त्याचे चिखलानें भरलेले हात तिच्या दृष्टीला पडले आणि कपाळाला आठ्या घालून ती म्हणाली, " हात धू जा आडावर जाऊन. घाणेरडा कुठचा ! "

दिनू जास्तच चिडला. हात कशाला धुवायचे ? थोडे वाळल्यावर जोरानें चोळले कीं सारा चिखल आपोआप जाईल निघून. काय तरीच आईचें ! मग दाणदाण पाय आपटीत तो परसदारीं गेला. दोन्ही हात स्वच्छ पाण्यानें भरलेल्या

डोणेंत बुचकुळून त्यानें चड्डीला पुसले. परत आईपुढें येऊन तो ओरडला, " आणि टोपी कुठाय् माझी ? "

मग शोधाशोध झाली. माजघर, स्वयंपाकघर, ओटी, खुंट्या, कोनाडे, कोपरे पण टोपी सापडलीच नाहीं. बराच वेळ दोघां मायलेकांनीं धुंडलें तेव्हां पोत्याच्या कडेला पडलेली आढळली. ती झटकून डोक्यावर बसवीत आणि पाटी गुढग्यावर आपटीत दिनू बाहेर पडला.

घरांच्या सावली-सावलींतून शाळेकडे जातां-जातां त्याला मुसलमानाचा हामजा आणि त्याचा लहान भाऊ आबास शाळेला जातांना दिसले. गोंड्याच्या टोपीवर पाटी-पुस्तक धरून हामजा लंगडी घालीत होता. भिंतीकडेच्या अरुंद गटारावर दोन्ही बाजूला दोन पाय ठेवून आबास उड्या मारीत चालला होता.

डाव्या हाताचीं दोन बोटें तोंडांत घालून दिनूनें आखुड शीळ फुंकली. आपल्या सोबत्याला बोलावण्याची ती पद्धत शाळेंतल्या सगळ्या मुलांनीं उचलली होती.

हामजा थांबला. आबासही थांबला. दरम्यान् दिनू त्यांच्यापाशीं जाऊन पोंचला. दिनूनें विचारलें, " हामजा, तू गणितं सोडवलींस ? "

हामजानें नकारार्थी मान हालवली. त्रासिक चेहरा करून तो म्हणाला, " पण मास्तर मारायला लागला तर मी आब्बाला जाऊन सांगीन. त्यानंच मला म्हैस राखायला पाठवलं होतं ! "

" मीसुद्धां सोडवलीं नाहींत. छड्या घ्याव्या लागणार मला ! "

मधेंच लहानगा आबास पाटी वाजवून म्हणाला, " आमाला गणितंच नाहींत, हुर्यो ! "

दिनूनें त्याला चूप केलें, " तूं अजून एलफंडींत आहेस, तुला काय समजणार गणितांतलं ? "

मग कांहीं वेळ तिघांनींही विचार केला. आबासनें आपल्या खमिसाचें टोक तोंडांत घालून चोखलें. हामजानें पालथ्या मुठीनें आपलें नकटें नाक जोरजोरानें चोळलें. दिनूनें बोटांचीं नखें कुरतडलीं, आणि मग एकाएकीं त्यानें निर्णय घेतला, " आपण शाळेंत जाऊंयाच नको ! "

सर्वांनाच ही कल्पना पसंत पडली. " हुर्यो ! मास्तराची चांगलीच जिरली ! "

मग हामजानें घरीं चहाडी न करण्याबद्दल आबासला ताकीद दिली. आणि ते तिघेहि गुपचुप् ओढ्यावर गेले.

तरवड, घाणेरी, चिंच, करंज या झाडांच्या दाटीमधून पांढराशुभ्र ओढा धावत होता. त्याचा खळखळाट पोरांनीं ऐकला. शेवाळ, करंज आणि चिंचा यांचे एकमेकांत मिसळलेले वास हुंगले आणि मग मोकळ्या रानांत सोडलेल्या वासरांसारखीं तीं वाळूंत हुंदडलीं. हामजा म्हणाला, “आपल्या पाट्या वाळूंत पुरून ठेवूं म्हणजे गमावणार नाहींत.”

दिनूनें भसाभसा वाळू उकरून एक छोटासा खड्डा तयार केला, त्यांत सर्वांचीं पाट्या-पुस्तकें पुरलीं. वर वाळूचा ढीग करून खुणेसाठीं दगड ठेवला.

दुपारचें ऊन धारेंत पडलें होतें. खळखळती धार चमकत होती. छोटे-छोटे मासे तिच्यांत पोहत होते. कधीं सूर मारून ते पुढें जात, तर कधीं आपल्या नाजूक शेपट्या लुटुलुटु हालवीत एका जागीं स्थिर राहत.

हामजानें तुमान खोचली. खमिसाच्या बाह्या वर सारल्या. धारेंत शिरत तो म्हणाला, “ मी मासे धरणार ! ”

दिनू आणि आबास धारेच्या कडेला उभे राहून बघूं लागले.

एक आंगठ्याएवढा मासा उथळ पाण्यांत तरत होता संथपणानें. त्याचा रंग खालच्या वाळूसारखाच होता.

पायाचा आवाज न होऊं देतां हामजा हळूहळू एक-एक पाऊल उचलूं लागला. हलकेच खालीं वाकला. फुलपांखरूं पकडतांना करावे तसे त्यानें आपले दोन्ही हात केले. दोन्ही पंजांचे आंगठे एकमेकांत गुंतवले आणि सावकाशपणें अगदीं पाण्याला टेकवले !

दिनू आणि आबास यांनीं श्वास रोखले. कपाळावरचे केस सारून डोळे मोठे केले.

मासा अजून स्थिर होता. आपली नाजूक शेपटी हालवीत एका जागीं राहिला होता. मग हामजानें विलक्षण चपळाई केली. माशावर गपकन् झडप टाकली.

दिनूच्या पोटांत एकदम खड्डा पडला. आबासच्या पण. हातांत असलेली वाळू गच्च धरून हामजा धारेबाहेर आला आणि त्यानें ओंजळ उघडली.

थुत् ! त्यांत कांहींच नव्हतें !

धारेकडे बोट दाखवीत दिनू ओरडला, “ अरे, तो बघ, पुढं पळाला. ”

तो लुच्चा मासा खडकाच्या आडोशाला जाऊन लपला होता.

मग वाळूचे हात झाडून हामजा पुन्हा पुढें सरसावला. दबत-दबत खडकापाशीं जाऊं लागला. माशापाशीं पोचला. पुन्हा त्यानें हाताची पकड तयार केली. अगदीं हळूच वाकून माशावर धरली. पण एवढ्यांत तो हुषार मासा सुळकन् पुढें गेला. हामजा धावला. तसे आबास आणि दिनूही धारेच्या कडेकडेनें त्याच्या पाठोपाठ गेले. पण मग मासाच कुठें गडप झाला. पोरांची नजर चुकवून कुठें नाहींसा झाला.

हामजा म्हणाला, " दिनू, शेवाळाच्याखालीं मासे दडतात. वरून गप्‌कन झडप टाकून शेवाळ धरायचं आणि कोरड्या वाळूंत टाकायचं कीं मग चार-दोन मासे तडफड-तडफड करतात ! "

आणि माशांचें तडफडणें त्यानें अगदीं हावभावासकट करून दाखवलें. आबासला खूप हसूं आलें, पण तोंडावर हात ठेवून त्यानें तें झाकून टाकलें.

दिनू म्हणाला, " चल मग, आबास, आपण वर जाऊं. तिकडं असंल शेवाळ ! "

गांवाचा पाणोठा सोडून तीं तीन मुलें धारेंतून खूप-खूप वर गेलीं. हिरवें बिळबिळीत शेवाळ, खडकाचीं भोकें आणि लव्हाळ्याच्या जाळीदार मुळ्या यांतून हात घालीत; पायानें पाणी उडवीत.

मग आठ-दहा मोठे मासे हामजानें पकडले. मासा सापडतांच तो त्याला कोरड्या वाळूवर बदाबद आपटी. आणि तो मार खाऊन मेला म्हणजे खमिसाच्या पुढल्या पारव्याला गाठी मारून तयार केलेल्या झोळींत टाकी. आपलीं तांबडींलाल आणि चिमुकलीं तोंडें वासून ते सारे मासे झोळींत पडून राहत. हामजा दिनूला माहिती देई, " दिनू, हा डोकरा बरं का, काळ्या पाठीचा. आणि हा छोटा मिशावाला झिंगा ! "

मग दिनू त्याला हात लावून पाही.

" कसे रे खातां तुम्ही मासे ? "

" अरे, तुला काय त्याची चव ? आतां मी यांचीं पोटं फोडून घाण बाहेर काढीन. खवले काढीन. शेपटी आणि हे कल्लेसुद्धां चिरून टाकायचे बरं का ! आणि मग तव्यांत भाजून, चटणीमीठ टाकून खायचे ! "

दिनूच्या तोंडाला पाणी सुटलें. आबासनें खमिसाची बाही चघळायला सुरवात केली.

लवकरच मुलांना या खेळाचा कंटाळा आला. हामजानें दिनूची गांधीटोपी पाण्यांत भिजवली. त्यांत सारे मासे घातले. तुमानीच्या नाडींत ती खोचून तो म्हणाला, " आपण काटेवनांत जाऊं, व्हल्याचीं अंडीं काढायला ! "

ओढ्याच्या एका कडेला हें काटेवन विलक्षण रीतीनें वाढलें होतें. बाभळी, बोराटी, नेपती आणि कितीतरी प्रकारचीं झाडेंझुडपें यांची गिचमीड त्यांत होती. खेड्यांतल्या बायका जळणासाठीं तिथें येत. रामोशी आणि मांग मधाचीं पोळीं गोळा करून नेत. गुराखी पोरें बोरा-जांभळाच्या दिवसांत कांटेवनांतच शिरत.

अनवाणी पायांनीं कांट्याकुट्यांतून वाट काढीत हीं तीन मुलें त्या गिचमिडींत शिरलीं तेव्हां बोराटीच्या झाडावर पिसें उकरीत बसलेल्या भोरड्यांनीं गोंगाट केला. पोटाखालीं अंडीं घेऊन कोट्यांत बसलेल्या व्हल्यांनी आपल्या गोल डोळ्यांची चमत्कारिक उघडझाप केली. माना वाकड्या करून ते सावट घेऊं लागले. बाभळीच्या बुंध्यावर बसून वाळलीं बोरें खाणारी एक खार शेपुट उडवीत पळाली आणि वरच्या खोडावर उलटी होऊन चिरकूं लागली. कोट्यांत बसलेलीं तिचीं तीन पिलें विलक्षण घाबरलीं.

एका झाडाकडे हात करून दिनू ओरडला, " अरे, तें बघ व्हल्याचं कोटं. "

हामजानें पाहिलें.

" दिनू, तें कोटं व्हल्याचं नव्हे, रानचिमणीचं आहे. त्यांच्या पाठी विटकरी रंगाच्या असतात आणि गळ्याखालीं पिवळा ठिपका असतो ! "

" कसं रे तूं ओळखतोस ? "

" हात् तिच्या ! त्यांत काय, व्हल्यांचं कोटं काटक्यांचं असतं, आणि हें बघ नुसत्या कुसळांनीं केलं आहे, मऊ-मऊ ! "

हामजा दबकत-दबकत त्या कोट्यापाशीं गेला, बुंध्यावर चढला आणि कोटें काढण्यासाठीं त्यानें हात घातला. तशी एक बारकी चिमणी भुर्रकन् त्यांतून उडाली आणि वरच्या डाहळीवर जाऊन बसली. आपली एवढीशी शेपटी नाचवीत चिवचिवूं लागली. हामजानें सांगितल्याप्रमाणें तिचा रंग होता.

" अंडीं आहेत कारे, हामजा ? " आबासनें विचारलें.

" नाहीं-नाहीं. आतांशी कुठं ती कोटं तयार करायला लागलीय्. तें पुरं झालं म्हणजे ती घालील ! "

आबासला अंडीं बघण्याची अति घाई झाली होती. हामजानें एक व्हल्याचें कोटें त्याला दाखविलें. बोराटीच्या एका बुरव्या झाडावर फांद्यांच्या बेचक्यांत तें होतें. फिकट जांभळ्या रंगाचा व्हला त्यांत बसला होता.

" आबास, हा पठाणी व्हला हं, आपल्या व्हल्यापेक्षां मोठा असतो ! " हामजानें माहिती दिली.

मग दिनूनें नेम धरून एक धोंडा भिरकावला. पठाणी व्हला भुर्रकन उडून गेला. मोठ्या मुष्किलीनें दिनू त्या झाडावर चढला. बोराटीच्या वाकड्या कांट्यांनीं त्याच्या अंगाचे ओरखाडे काढले. तरी तो डरला नाहीं. त्या काटक्यांच्या कोट्यांत दोन अंडीं होतीं. लहान आणि पांढरींशुभ्र. हळुवार हातानें तीं दिनूनें काढून घेतलीं. आणि तो खालीं उतरला. उतरतां-उतरतां त्याचा सद्रा फाटला.

आबासनें तीं अंडीं आपल्या खमिसाच्या खिशांत बंदोबस्तानें ठेवून दिलीं. मग कांटेवनांतून मुलें हिंडहिंड हिंडलीं. व्हल्या पारव्यांची कोटीं शोधत. खारींच्या-मागें धावत. बाभळीवरचा पांढरा-पिवळा डिंक गोळा करीत फिरलीं. हामजाची टकळी सारखी चालू होती, " आबास, आपण हा डिंकाचा गोळा आतां वाण्याला देऊं. चांगले चार पैसे येतील ! "

छोटा आबास खमिसाच्या बाहीनें नाक पुशीत भावाला दुजोरा देत होता, " हो-हो, आणि मग उरसादिवशीं आपण त्याची शिट्टी घेऊं, नाहींतर तीळ लावलेल्या रेवड्या. "

उरसाचें मजेशीर वातावरण आठवून दिनूच्या डोळ्यांची चमत्कारिक उघडझाप होत होती. आबास रेवड्याऐवजीं हाताचा अंगठा चोखत होता. आणि झाडाच्या सावलींतून खालींवर बघत नाना वासानें भरलेल्या त्या ऊबदार हवेंतून मुलें भटकत होतीं.

एखाद्या झाडाकडे बोट दाखवून आबास विचारी, " हामजा, ही देवबाभळ, होय ना रे ? "

" हां, ही देवबाभळ, बुटकी आणि डेरेदार. हिचे काटेही खूप मोठे असतात. "

" आणि रामकाठी कोणती रे, आबास ? " दिनूनें विचारलें. कारण शेरडें राखणाऱ्या पोरांकडून हा शब्द त्यानें ऐकलेला होता.

आबास म्हणाला, " काटे नसतात त्या बाभळीला, दिनू. आणि लिंबाऱ्यासारखी उंच-उंच वाढते ती रामकाठी. शेरडांना खायला उत्तम ! "

त्या जंगलांतून असल्या अनेक नवीन गोष्टी दिनूनें पाहिल्या. सुरेख पक्षी, पांढरे उंदीर. हिरव्या पंखाचे झगझगीत सोनकिडे. ते धरून काड्यापेटींत ठेवायचे आणि बाभळीचा कोवळा पाला त्यांना खाऊं घालायचा, म्हणजे ते अंडीं घालतात. नेपतीचीं तांबडींलाल फळें. कोळीश्राचीं विलक्षण कोटीं. मधाचीं पोळीं. कितीतरी गोष्टी !

चालतां-चालतां आबासच्या कोवळ्या पायांत एक कांटा भसकन् शिरला. तेव्हां पाय वर धरून तो रडायला लागला. हामजानें त्याला खालीं बसवलें. देवबाभळीचा एक मोठा कांटा घेऊन त्यानें कांटा काढायचा प्रयत्न केला. पण तो पार आंत गेला होता. मग त्यानें रुईचें झुडूप शोधून काढलें. पान मोडून त्याचा पांढरा चीक कांटा मोडला त्या ठिकाणीं लावला.

" आबास, उद्या सकाळीं कांटा आपोआप बाहेर येईल, तूं रडूं नकोस ! "

सूर्य पश्चिमेकडे कलला. वारा सुटला. पिकाचा आणि काळ्या मातीचा सुगंध दरवळला. कांटेवनांतील पांखरें गोंधळ करूं लागलीं.

हामजा म्हणाला, " अंधार पडंल, आपण घरीं जाऊं. "

गेलीं तशींच ओढयाच्या कांठाकांठानें मुलें परत आलीं. आबासच्या खमिसांतलीं अंडीं केव्हांच फुटलीं होतीं. त्याचे पांढरे-पिवळे आणि चिकट डाग पडले होते. ते त्यानें पाण्यांत धुतले. भूक लागली तेव्हां हामजानें डिंकाचा एक-एक खडा दोघांनाही दिला, आपण खाल्ला ! त्या चवदार डिंकानें त्यांचीं तोंडें चिकट झालीं. दाढेला दाढ चिकटूं लागली.

ते गांवापाशीं आले तेव्हां आभाळ डाळिंबाच्या फुलासारखें झालें होतें. रानांतून घरीं येणारीं शेळ्या-मेंढरें 'बें-बें' करून ओरडत होतीं. त्यांच्या खुरांनीं उधळलेली धूळ गांवावर तरंगत होती.

पुरून ठेवलेलीं पाटी-पुस्तकें काढून तिघेही आपापल्या घरीं गेले.

दिनूची आई समई पुशीत बसली होती. दिनूला बघतांच ती म्हणाली, " किती रे उशीर ? आणि तोंड एवढं तांबडंलाल कशानं झालंय् ? उन्हांत हिंडलास का ? "

दिनू कांहींच बोलला नाहीं. अजूनही तो कांटेवनांतल्या विलक्षण वातावरणांत

होता. पायानें पाणी उडवीत होता. मासे पकडीत होता. व्हल्याचीं कोटीं काढीत होता. डिंक गोळा करीत होता.

आईला वाटलें, मास्तरांनीं मुलांना खूप खेळवलेलें दिसतें. त्यानेंच उशीर झाला. आणि मग आपला एवढासा मुलगा न चुकतां शाळेंत जाऊन शिकतोय या जाणिवेनें त्या माऊलीचें मन समाधानानें कांठोकांठ भरलें !



# दादा

दम्यानं वाळलेले, पाठींत वाकलेले, डोईला पांढरा पिवळा रुमाल बांधलेला. अंगांत बंद गळ्याचा लांबडा कोट. खालीं तांबडं झालेलं जाडं भरडं धोतर. त्याचं लोळतं टोक एका हातांत धरून खोकत खोकत दादा घरीं यायचे.

त्यांचा खोकला आई फार लांबून ओळखी. बारा वाजेपर्यंत पोराबाळांच्या धांदलींतून तिचा हात स्वयंपाकाला लागलेलाच नसे. दादा लांब आहेत तोंवरच,

" आले रे बाबा ते कचेरींतनं ! अजून माझी चूल मुद्दां पेटली नाहीं. "

असं बडबडत तिची धांदल सुरू होई. दादा येत. रुमाल, कोट, सदरा काढून खुंटीला अडकवीत आणि छातीवरचे पांढरे केस शोधीत जेनावर बसत.

मग मी म्हणें,

" दादा, आमाला पुस्तकाला पैसे हवेत ! चार महिने झाले वर्ग बदलून. केव्हां घ्यायचीं पुस्तकं ? मास्तर वर्गात बसूं देत नाहींत. म्हणतात, पुस्तकं आण आणि मग बैस ! द्या आज पैसे. "

दादा पांढरा केस उपटीत म्हणत,

" बराय् हं, सांगितलेत सोनाराला करायला ! " दादांचं हें उत्तर नेहमींचं असे. ते कधीं चिडत नसत कीं खेंकसत नसत. शांतपणानें सांगत. जास्तच हट्ट धरला, रडकुंडीस आलों तर कनवटीची आणेली पुढें टाकीत आणि म्हणत,

" हं. हे घे. दोन पैशांचे चुरमुरे फुटाणे आणून दे मला, आणि बाकीचे घे. आण पुस्तकं ! " मग माझा हट्ट जिरे. आणेली घेऊन मी उड्या मारीत वाण्याकडे जाई आणि सद्रयाच्या पुढल्या पारव्यांतून चुरमुरे फुटाणे घेऊन येई. दादा ते आपल्या समोर पसरीत. आशाळभूतपणें आम्हा भावंडांचा गराडा

भोवतीं पडे. त्या दोन पैशांच्या चुरमुऱ्यांतले चार चार दाणे सर्वांना मिळत. उरलेल्यांतून एक एक वेंचून दादा तोंडांत टाकीत आणि मग स्वयंपाकघरांतून आई कडाडे,

" जळ्ळं मेलं तें अभद्र खाणं ! पोरासोरांसारखं चिरमुरे काय खायचे ? झाला थोडा स्वयंपाकाला उशीर, लागली असंल भूक, पण हें काय ? म्हातारपण झालं तरी पोराटकी सुटत नाहीं ! "

पण तिच्या बोलण्याचा दादांवर कधीं परिणाम होत नसे. ते आपले रसिकपणें चिरमुरे खात. आई अधिकच चिडे. म्हणे,

" उठा आतां. "

चिरमुरे संपवून दादा उठत. आंघोळ करत. मुकटा नेसून पूजा करतां करतां व्यंकटेशस्तोत्र म्हणत—

अन्नासाठीं दाही दिशा आम्हा फिरविशी जगदीशा
कृपाळू वा पुराणपुरुषा करुणा तुजशी कशी न ये

पूजा संपतांच हाक येई,

" यंकाण्णा —"

मी धांवत आंत जाई. दुधानं भरलेली नैवेद्याची बारकी वाटी माझ्याकडे देऊन दादा म्हणत, " हं. हें टाका पिऊन ! "

मग जेवणासाठीं ताटं मांडलीं जात. ज्वारी बाजरीच्या भाकरी आणि एखादी आमटी, तिखट, लोणचं. यापेक्षां अधिक चोचले सोळा रुपये मासिक मिळकतींत परवडणं शक्य नसे.

जेवण संपतांच दादा थोडे इकडे तिकडे करत. आईची चेष्टा करून तिला खिजवत. जेनावर आडवे होऊन, हात उशाशीं घेऊन थोडी डुलकी घेत, आणि पुन्हां कचेरींत जात. नंतर परत यायला पांच साडेपांच वाजत !

कुंडलला असतांनाचे आमचे दिवस हे असे गेले ! माडगुळला शेतीवाडी होती. घरदार होतं. पण कष्टाअभावीं त्याची पडझड झाली होती. विहिरी पडल्या होत्या. जमिनीची नांगरट पांच पांच वर्षांत झाली नव्हती. घराला पुढचं दार लावायचं राहून गेल्यानं बामणाच्या वाड्यांत लोक गुरं बांधत होते ! आणि आम्ही अन्नासाठीं दाही दिशा फिरत होतों !

आई दादांच्या पाठीं भुणभुण लावी, " अहो, वर्षांतून एकदां तरी गावीं जात जा. जमिनी नीट खंडानं लावा. त्या घराला कुंब्या घालून घ्या. "

दादा म्हणत,—

" जाऊं, बघूं–"

धडपड, खटपट दादांच्या रक्तांत नव्हती. माणेच्या डोहाप्रमाणं ते संथ होते. शांत होते. दारिद्र्य त्यांच्यामागं हात धुवून लागलं होतं. पण ते कधीं हरले नाहींत; हटले नाहींत. चिवटपणानं त्याच्याशीं सामना करीत त्यांनीं पन्नाशी गांठली.

सरकारी कामावर असतांना खेड्यापाड्याचे लोक येत. घरीं येऊन म्हणत,

" बापू, एवढं काम करा. चिरीमिरी देईन. " पण त्यांनीं लांचाचा पैसा शिवला नाहीं. त्यांचें हें साधुत्व बघून आईच्या कपाळाची शीर उठे. ती म्हणे,

" एवढं मान मोडून काम करतां. लोक आपणहून मोबदला देतात तर तो नाकारतां. काय म्हणावं तुमच्या भोळेपणाला ? अशानं तुमच्या कपाळाचं दळिद्र जन्मभर संपणार नाहीं ! "

दादा उत्तर देत,—

" अग, काम करतों त्याबद्दल पंतबाबा पगार देतो. लांच खाऊन तें पाप कुठं फेडूं ? सचोटीनं मिळेल तो घास आपला. यंकोबाच्या मनांत मी दारिद्र्य भोगावं असें आहे. त्याची मर्जी ! "

दादांची श्रद्धा अशी होती. त्यांचा बाणा हा असा होता. पुढं बढती झाली. बारनिशी कारकुनाची जागा जाऊन दादा वहिवाटदार झाले. किन्हईला बदली झाली. हीं तीन वर्षं वैभवाचीं होतीं. रहायला पंतसरकारचा तीनमजली राजवाडा होता. हाताखालीं पांचदहा नोकरचाकर होते. पण तरीही त्यांचा बाणा टळला नाहीं. मन चळलं नाहीं. नोकरचाकरावर तोंड टाकून ते कधीं फडाफडा बोलले नाहींत. कीं पगाराव्यतिरिक्त एका दिडकीला शिवले नाहींत. पंतबाबांची चाकरी त्यानीं इमानेंइतबारें केली. लोक म्हणत,

" इथं इतके वहिवाटदार आले, पण बापूची सर एकाला नाहीं ! म्हातारा भारी सज्जन, देवमाणूस. " दादांची किन्हईची मिळकत ही एवढीच. आणि उभ्या आयुष्यांतही त्यानीं कांहीं माया साठवली असेल, तर तीही हीच, अशीच.

सुखासमाधानाचीं हीं तीन वर्षं फार लवकर संपलीं ! कुंडलला फिरून बदली

झाली. या नतद्रष्ट गांवानं दादांना अति छळलं आहे. संस्थानी कारभारांत केव्हां बढती आणि केव्हां उतरती होईल, त्याचा नेम नसे. आई नेहमीं गांजून म्हणे,

" घरचं खावं आणि पंतबाबाची चाकरी करावी! या संस्थानी अनागोंदींत घटकेंत सौभाग्यवती आणि घटकेंत गंगाभागिरथी! "

कुंडलचीं पांच चार वर्षं अति त्रासाचीं गेलीं. काळजीनं आणि दम्यानं दादा फार खंगले. रात्ररात्र भर तक्क्यावर डोकं टेकून ते खोकत. त्या विलक्षण उबळीनं, जुनं घर सोसाट्याच्या वाऱ्यानं डळमळावं तसं, त्यांचं शरीर डळमळे. तरीही संसाराचा गाडा ते ओढीत होते. आम्हा पांच लहान धाकट्या भावंडांना भरवीत होते. रोज कचेरींत जात होते. खर्डेघाशी करीत होते. मामलेदाराचीं बोलणीं खात होते. अहो, आमच्यासाठीं त्या देहानं किती कष्ट सोसले! त्या मनानं किती दुःख गिळलं!

कुंडलच्या मुक्कामाचा शेवट अति वाईट झाला! एकाएकीं संस्थानला वाटलं कीं, सरकारी नोकर इथून तिथून तरुण हवेत. म्हाताऱ्याकोताऱ्यांना डिच्चू द्यायला हवा! आणि दादा कमी झाले! पांच मुलांचा पोशिंदा निराधार झाला! गांठीला पैसे नव्हते. या संधीचा फायदा घेऊन वाणी पुढं सरसावले. घरमालक जोरावर आला. संसार गोळा करून आपल्या खेड्यांत जायला निघालेल्या म्हाताऱ्याच्या गाड्या त्यांनीं अडवल्या! बिलाबदलीं चार भांडींकुंडीं बाहेर काढण्याच्या धमक्या त्यांनीं दिल्या. दारिद्र्यानं खचला नाहीं तो म्हातारा अब्रूनं खालीं आला. आईच्या डोळ्याचं पाणी खळलं नाहीं. ती म्हणाली,

" अहो, कोल्हापुराहून आण्णाला बोलवा, आटपाडीहून भालूला बोलवा!"

दादा उत्तरले,

" अग, पोरं अजून नकळतीं आहेत. आत्ताशीं कुठं आपल्या पंखानीं उडायला लागलींत. त्यांना कशाला या खाईत बोलावतेस? आहेत तिकडे सुखांत असूं देत!"

पण तिनं ऐकलं नाहीं. दोघां थोरल्या मुलांना पत्रं घातलीं. भालू आटपाडीला काकापाशीं राहून मराठी सातवी इयत्ता शिकत होता. आण्णा कोल्हापूरला वि. स. खांडेकरांची लेखनकामाठी करीत होता. पत्र मिळतांच किरकोळ अंगाचा भालू घाबरा होऊन आला. रिकामा आला. आण्णा तसा आला नाहीं. त्यानं आपली पुण्याई खर्चीं घालून येतांना पैसे आणले. मी पुलाच्या कट्ट्यावर बसून

किर्लोस्करवाडीहून येणाऱ्या गाडीची वाट पहात होतों. आणि चिरचिऱ्या पावसांतून भिजत आण्णा आला. त्याच्या पायांत रबरी बूट होते. अंगावर पावसाळी कोट होता. मला वाटलें, ' आपला अण्णा किती श्रीमंत झाला ! '

अण्णा आला. पैसे घेऊन आला आणि म्हाताऱ्याची अब्रू बचावली. कुंडलची हलाखी संपवून आम्ही माडगुळास आलों. परमेश्वरा, तुझी लीला अगाध आहे !

आपल्या खेड्यांत दादा आतां सुखांत होते. त्यांचं उतार वय झालं होतं. फारा दिवसांचा दमाहि थोडा फार विसंबला होता. दादा आतां सुखांत होते. भाऊमास्तरांनीं संसाराचा भार स्वतःच्या शिरावर घेऊन वडिलांना मोकळं केलं होतं. आण्णा कोल्हापुरीं सिनेमा व्यवसायांत पडले होते. कवि, लेखक म्हणून त्यांनीं नांवलौकिक मिळविला होता. चार पैसे मिळविले होते. लक्ष्मी-सरस्वती-सारख्या दोन सुना घरांत आल्या होत्या. म्हातारे दादा आतां सुखांत होते. निवांत होते. म्हातारपणामुळें त्यांना रात्रभर झोप लागत नसे. अंगणांतल्या लिंबावर चिमण्या कुलकुलायला लागल्यावर ते अंथरुणावर उठून बसत आणि भूपाळ्या म्हणत.

उठा उठा साधू संत  साधा आपुलालें हित
गेला गेला हा नरदेह  मग कैंचा भगवंत...

लेकांनी हौसेनं घेतलेली पुतळी गाय जागी होई आणि हंबरे. मग दादा उठत आणि तिला पेंडी टाकत.

धाकटी सून सासऱ्याला सकाळच्या प्रहरीं कपभर गरम चहा आणि बशीभर सांजा देई. सर्वांत लहान मुलगा थोडा हूड आणि नकळता होता. त्याच्या हातावर दादा सांज्याचा थोडा मुटका ठेवीत. सून म्हणे,

" अहो, तुमच्यांतला कशाला देतां ? मी देतें कीं त्यांना. "

त्यावर दादा हंसत आणि म्हणत,

" अग, म्हाताऱ्याला कशाला इतकं संभाळतां ? ह्या लहान धाकट्याकडे बघा. "

दादा असं म्हणत, पण सून आपल्याला जपते या जाणिवेनं त्यांचा सुरकुतला चेहरा समाधानानं फुलून येई. खांद्यावर उपरणं आणि हातांत काठी घेऊन ते म्हणत,

" जरा रानाकडनं चक्कर मारतों. पिकं बघून येतों. "

त्यावर भालूमास्तर म्हणत,

" काय नडलंय त्याचं ? पाय दुखतील. दमा होईल. पकूला घेऊन चावडीपुढं जा फार तर ! "

पण हटवादी दादा ऐकत नसत. काठीच्या आधारानं पावलं टाकीत ते चालूं लागत !

वाटेंत ईश्वर रामोशी भेटे. आदरानं रामराम घालून पुसे,

" कुणीकडं दादा ! "

" जातों जरा गावांत. बघून येतों."

" काय जर्वर हाय ? झोकांत हाय पीक. भालू मास्तर बघत्याल तकडं. तुम्ही कशाला तकाटा घेतां ? "

त्यावर दादा प्रसन्नपणें हंसत. म्हणत,

" ईश्वरा, अरे घरांत बसून कंटाळा येतो. म्हणून पाय मोकळे करतों झालं. तुझ्या म्हातारीला गोड वाटत नव्हतं. बरी हाय का ती ? दवापाणी दिलंस का ?

" व्हय जी, दिला. बरी हाय आतां."

" बरं तर. ठीक. म्हातारीला संभाळत जा ! "

अशीं प्रश्नोत्तरें होऊन दादा चालूं लागत.

आतां दादा समाधानी होते. पोरांच्या कर्तबगारीमुळें जोमांत होते. म्हारापोरांना ते सढळ हातानं देणगी देत.

विहिरीचं काम निघालं. वडाराला पैसे देण्याच्या बाबतींत भालूमास्तर घासाघीस करूं लागले म्हणजे सोप्यांतल्या भल्या मोठ्या लांकडी पलंगावर बसलेले दादा म्हणत,

" काय मागतोस तूं दाम ? "

वडार बोले.

" मास्तर लई घासाघीस करतो. दादा तूं बघ. माजंबि पोट हाय."

" कबूल आहे. किती दाम हवा तुला ? "

" लई न्हाई मागत. एक बोट आगाव दे ! "

" शंभर ? चल घे—"

भालूमास्तर वडिलांपुढें बोलत नसे. शंभराचं पुडकं हवालीं करून दादा वडाराला तंबाखूची चिमट देत आणि वाटेला लावीत.

आई हाताची सढळ पण तोंडाची फटकळ. चुकार वाटेकऱ्यावर तिनं तोंड टाकलं कीं दादा म्हणत,

" अग ? कां तोंड वाजवतेस ? आतां काय करायचंय तुला प्रपंचांत लक्ष घालून ? किती जगायचं आहे ? जाऊं दे त्याला. त्यालाही पोटपाणी आहे. लेकरंबाळं आहेत. खाल्लं असेल मण आठ पायली. खाऊं दे ! "

दिवसभर भाल्मास्तरांच्या प्रकाशला खेळवत ते घरींच असत. संध्याकाळीं बाहेर पडून मारुतीच्या देवळांत जाऊन बसत. साऱ्या वृद्धांचा मेळा तिथं जमे. दिवसभर ऐरणीवर घाव घालून थकलेले सोनारबाबा, रिकामपणाला कंटाळलेले आप्पाजीपंत, कुणीच जवळचं नसल्यामुळें निर्विकार बनलेले विनूतात्या, तो तुका कंडऱ्या, तो पांडा न्हावी, तो वरलीकडचा मार्तंडा, सारे जमत. खांबाला टेकून बसत आणि नाना विषयांवर बोलत. तुका कंडऱ्या आपल्या आठवणी सांगे. तोंडांत दांत नसलेले सोनारबाबा त्याची चेष्टा करीत. दादांना म्हणत,

" दिगूबा, हा कंडऱ्या आतां कशाला जगला असंल ? याचं काय काम इथं ? "

दादा हंसून म्हणत, " त्याचं पान अजून ब्रह्मदेवाला सांपडत नाहीं ! "

असा विनोद चाले. दिवेलागणीला दादा उठून घरीं येत चार घांस खात आणि पुनः रात्रीं नवराबायको देवळांतल्या पोथीला जात. भक्तिभावानं हरिविजय, भक्तिविजय ऐकत.

दादांची समाधानी वृत्ति अलीकडे अधिक वाढली होती. संसारापासून ते आतां अलिप्त होऊं पहात होते.

दादा अंथरुणावर आहेत. त्यांचा देह अस्थिपंजर झाला आहे. मुंबईहून मी आलों आहें. पुण्याहून आण्णा आले आहेत. दादा या आजारांतून बरे व्हावेत यासाठीं प्रयत्नांची शिकस्त चालू आहे. आम्ही सगळे आलों आहोंत. पण अजून मोठ्या वहिनी पुण्याला आहेत. माझी धाकटी बहीण पुण्याला आहे. अक्का आटपाडीला आहे.

मध्यंतरींच्या काळांत फार घडामोडी झाल्या आहेत. आमचं जुनं घर गांधीवधाच्या दंगलींत जळून गेलें. पण दादा डरले नाहींत. ते म्हणाले;

" माझीं पोरं असलीं छपन्न घरं उभारतील ! " त्यांचं म्हणणं खरं झालं आहे. आण्णांनीं आणि भाल्मास्तरांनीं नवीन घर उभारलं आहे. नवा संसार

थाटला आहे. दादांच्या आदराखातर, प्रेमाखातर गांवकऱ्यांनीं घर बांधायला हातभार लावला आहे.

कुणाला न कळवतां सवरतां मी मोठं धाडस केलं आहे. एका परजातीच्या मुलीशीं लग्न केलं आहे. एक वर्षभर मी घरांतून बाहेर होतों. मी दूर असल्यामुळं दादांना वाईट वाटत होतं. ते माझी फार आठवण करीत होते. कुणापाशीं बोलत नव्हते, पण अंतरांत दुःखी होते. माझी त्यांना फार आठवण येत होती. 'मौजे-' च्या अंकाची ते उत्सुकतेनं वाट बघत. नातवाला पुढं घेऊन 'माणदेशी माणसं' मोठ्यानं वाचतांना त्यांचे डोळे पाण्यानं भरत.

मी एक वर्षानं त्यांना भेटलों आणि तोही अशा स्थितींत !

"दादा, मी व्यंका आलोंय-"

दादांनीं डोळे उघडून बघितलं. क्षीण आवाजांत ते म्हणाले,

"आलास ? बरं झालं !"

मी उशाशीं बसलों. दादा पुन्हां विव्हळत म्हणाले,

"अग, याला जेवायला घाल. भुकेला असेल !"

"दादा, मी जेवलोंय."

"कुठं ?"

"गाडींतच जेवलों. हॉटेल असतं गाडींत."

"तें इंग्रजी जेवण असेल. तुझं पोट भरलं का ?"

"इंग्रजी होतं खरं. मला आवडलं नाहीं."

"अरे, मग त्या मालकाला सांगायचं, मला हें नको म्हणून; मी इंग्रज नाहीं, ब्राह्मण आहें म्हणून !"

बाहेर बसलेले भाऊमास्तर या विनोदानं हंसले. आजारीपणांतही दादांचा विनोद चालू असे. मागं त्यांना वरचेवर ब्लडप्रेशरचे अटॅक येत. सारं अंग लटलटूं लागे. त्या आजारांत अंथरुणावर असतांना, त्यांनीं एकदां मला मोठ्यानं हांक मारली. घाबराघुबरा होऊन मी आंत गेलों. दादा म्हणाले,

"अरे, त्या कंदीलाला अटॅक्स आलेत बघ !" कंदील भगभगत होता, फटफटत होता.

आतांही त्यांचा विनोद चालूच होता. मग मी उशाशीं बसलों. दादांनीं मला नाना प्रश्न विचारले.

आतां काय करतोस? कुठल्या चित्रपटांतील करार झाला? किती पैसे मिळाले? आण्णाइतके कां मिळाले नाहींत?— दादांनीं नाना प्रश्न विचारले.

मी आलेल्या दिवशींच हें बोलणं झालं. त्याला दोन तीन दिवसही झाले नाहींत. आणि आज दादा बोलत नाहींत. त्यांच्या अंगाची घालमेल चालली आहे. त्यांच्या अस्थिपंजर देहांत एकाएकीं तडफ आली आहे. आम्हीं उशापायथ्याशीं बसून आहोंत. दादा निरखून पहात आहेत. माझा चेहरा. आण्णांचा चेहरा. दादा, तुम्ही असं काय करतां? तुम्हाला काय वाटतें?

काल उमा नाईक भेटीला आला होता. तो खोलीच्या तोंडाशीं बसून म्हणाला,

" दादा, मी कोण ओळखलं का? "

दादांनीं पाहिलें आणि हलकेच् ते बोलले,

" उमा, आतां आमी चाललों. आमच्या माघारीं घरीं येत जा, जात जा! "

उमा माझ्यापाशीं येऊन म्हणाला,

" दादा आज अवघड बोलले मला! "

दादा तुम्ही असं कां बोललां? आपला निर्वाणसमय तुम्हाला कळला आहे कीं काय? परवां मी आलों, तेव्हां किती बोललांत! मी आणलेलं सफरचंद तुम्ही चाखलंत. माझ्या हातून मोसंब्याचा रस तुम्ही प्यालांत. आणि आज सकाळीं मी द्यायला लागलों तसे म्हणालांत,

" गड्यांनो, आतां मला कांहीं घालूं नका. "

दादा, तुम्ही असं कां बोललांत?

छे, दादा आतां निघाले. आई गंगाजळ घालते आहे. आण्णा गीतेचे अध्याय म्हणत आहेत. काका चिमणीएवढं तोंड करून बसलेत. तात्यांचा चेहरा वनवासी दिसूं लागला आहे. दादा निघाले!

आण्णाच्या मांडीवर डोकं ठेवून दादा गेले आहेत! शोकाचा डोंब उसळला आहे.

बाहेर चांदणं टिपूर पडलं आहे. सारा गांव वाड्याबाहेर उभा आहे. आण्णा बाहेर आलेत. दरवाज्याचा आधार घेऊन उभे आहेत. त्यांचे डोळे डबडबले आहेत. दाटल्या घशानं ते लोकांना सांगत आहेत, " गड्यांनो, आज आम्ही पोरके झालों! "

★

# तात्या

तात्या दादांपेक्षां धाकटे. आमच्या आजोबांच्या ह्यातींत घरीं गुरंढोरं होतीं. शंभरावर मेंढरंदेखील होतीं. तें सारं लटांबर राखण्याचं काम तात्यांकडे असे. सकाळीं भाकरी बांधून घेऊन ते बाहेर पडत आणि दिवस मावळेपर्यंत गुरं चारीत रानोमाळ हिंडत. घरची चौकशी करीत नसत कीं गांवची पंचायत बघत नसत. हातीं लागेल तें ओरबाडून खावें आणि जनावरांच्या उस्तवाऱ्या करीत रहावें. यांतून लिहिण्यावाचण्याइतकं ज्ञान त्यांनीं कधीं आणि कुठं मिळवलं, हरि जाणे ! पण मिळवलं हें खरं. पुढं दम्याच्या विकारानं कर्तबगार आजोबा वारले आणि हीं तिन्ही भावंडं उघडीं पडलीं. आजोबांच्या मागोमाग घरची लक्ष्मीही गेली. गुरंढोरं नाहींशीं झालीं. कुणबावा बसला. त्या वावटळींत तिघे तिन्ही वाटांनीं गेले. दादा कारकुनी करूं लागले. काका पोलीसखात्यांत चिकटले. एकाकी तात्याही बाहेर पडले आणि सोलापूर माढ्याकडे रनर म्हणून पोस्ट खात्यांत राबूं लागले ! बरें हें कीं, दादांप्रमाणें या दोघांच्याही मागें प्रपंचाचें लिगाड नव्हतें. दोघेही सडेच होते. काकांनीं हातांनीं करून खाल्लें; पण शेवटीं त्यांच्या दोन हातांचे चार हात तरी झाले. तात्यांचें तेंही नाहीं. ते अद्यापही सडेच आहेत.

माडगूळ सोडून आम्ही नोकरीच्या गांवीं हिंडत राहिलों. तिकडे तात्यांचें जाणें येणें क्वचित् होई. वर्षानुवर्षं त्यांची कांहीं चिठीचपाटी येत नसे. ख्यालीखुशाली कळत नसे. ते कधीं तरी अकस्मात् यायचे. चारआठ दिवस राह्यचे. पोस्ट खात्याकडून मिळालेले जुने गणवेश, खाकी रंगाचीं गरम कुडतीं

ठेवून जायचे. त्यांच्या माघारीं त्यांची आठवण व्हायची ती या कुडत्यांवरूनच. थंडीचे दिवस आले कीं, दादा आईला म्हणायचे,

" अग, तें कोंडिबाचं कंडम कुडतं काढ कुठाय तें. बरं असतंय् भांचोत थंडीला ! "

मग आई जुनींपुराणीं बोचकीं सोडायची. तें गरम डगलं काढायची. दादांना तें घळघळीत होई तरी हातोपे मुडपून ते त्याचा वापर करीत. गणवेशाचीं कुडतीं उसवून त्याचे कोट आम्हाला होत. खाकी रंगाची लांबडी विजार कापून त्याची अर्धी चड्डी होई. उरलेल्या हातोप्यांच्या व पायाच्या आई पिशव्या करी ! तात्याचे हे गणवेश कसल्या ना कसल्या स्वरूपांत चार दोन वर्षं दिसत.

तात्या आणि दादा यांच्यांत नाहीं म्हटलं तरी थोडी तफावत आहे. दिसण्यांत आणि स्वभावांतहि. तात्या रंगानं चांगले काळे आहेत. उंच लांबसडक आहेत. डोळे अधू नसावेत, पण त्यांची उघडझांप चमत्कारिक, चार जणापेक्षां वेगळ्या तऱ्हेनं होते. नाक वाकडं. चेहऱ्यावर वांगाचे काळे डाग. तसले हातापायावरहि आहेत. रनरच्या कामामुळं पायांतहि वाकुडपणा आला आहे. पोलिसी थाटाच्या भल्या मोठ्या वहाणा घालून चालतांना त्यांचीं पावलं तिरकीं पडतात. एकंदर साऱ्या शरीराची ठेवणच खडबडीत, सुबकपणा नसलेली आहे. पोषाख हल्लीं वेगळा असतो; पण पूर्वी ठरलेला असे. खाकी रंगाचा पटका. तसल्याच रंगाचा पितळी बटणं असलेला कोट. खालीं धोतर. घरांतल्या कुठल्या तरी कोपऱ्यांत बसून, सावकाशपणें विडी ओढायचे. फारसे बोलायचे नाहींत. स्वभावानं तिरसट, एककल्ली वाटायचे. आईच्या शब्दांत सांगायचें म्हणजे, " तात्या आहे खुळा खंडोबा. मनाला खेळ आला तर ठीक, नाहींतर जानवं तोडून चालला देशांतराला ! "

उतार वयापर्यंत सारं आयुष्य तात्यांनीं एकाकी काढलं. हातांनीं करून तुकडे खाल्ले. मायेचं आपलं असं म्हणायला त्यांच्याजवळ कोणी नव्हतं. असे वनवाश्या-सारखे ते इतके दिवस कसे राहिले असतील, असा विचार मनांत आला म्हणजे आंतडं तुटतं ! दिसायला येडाबागडा दिसणाऱ्या या अस्राप, अबोल माणसानं परदेश कसा कटला असेल, असं वाटून पोटांत कालवाकालव होते !

नोकरी संपली आणि दिवसभर रानं धुंडून संध्याकाळीं घरीं परत येणाऱ्या पांखरासारखे तात्या माडगूळला आले. पुतळी गाय तेव्हां नवी घेतली होती,

तिची काळजी घेऊं लागले. कुणाशीं न बोलतांसवरतां त्यांचा उद्योग चालू असायचा. कधीं स्वस्थ बसायचे नाहींत. इकडचा धोंडा तिकडे टाकतील. वैरणीची गंज उलगडून पुन्हां व्यवस्थित रचतील. जुनीं दावीं पेड घालून दुरुस्त करतील. मागील दाराची भिंत ढासळली होती. त्यांतून शेरडं करडं आंत येत आणि फुलझाडं ओरबाडीत. शिवाय तो पडिक भाग दिसायलाहि वाईट दिसे. एके दिवशीं तात्यांनीं मनावर घेतलं. दगडं गोळा केलीं, चिखल मळला आणि तें छातीएवढं भिंताड स्वतः बांधून काढलं. मी म्हणालों,

"तात्या, तुम्ही कशाला व्याप केलात? गवंड्याकडून घेतली असती बांधून."

तेव्हां डोळ्यांची चमत्कारिक उघडझांप करीत ते म्हणाले, "गवंडी काय आभाळांतनं पडलाय? आपल्याला येत नाहीं बांधायला? आँ?"

माझ्या मनांत, तें भिंताड गवंड्याकडून सुबक बांधावें. पण तात्यांच्या हिशेबीं सुबकपणा नव्हता. उपयुक्तता होती. आडोसा झाला. शेरडं यायचीं थांबलीं. काम झालं!

पण तात्या घरीं टिकून राहिले नाहींत. कशांत तरी त्यांचं बिघडलं. डोकं गेलं. धोतर आणि अंथरुणपांघरुण काखोटीला मारून ते निघून गेले. निवाऱ्यास आलेले पुन्हां कोठें भडाडले. त्यांच्या जाण्याचं कारण आईनं बरोबर हेरलं. ती म्हणाली,

"त्याचं इथं व्यवस्थित होत नव्हतं. माझ्या मुलाबाळांच्या धबडग्यांत सकाळचा चहा दुपारीं आणि दुपारचं जेवण तिसऱ्या प्रहरीं. मुलांबाळांच्यांत राह्यचं म्हणजे असं होणारच. जाऊं दे गेला तर. जाऊन जाईल कुठं? हातपाय चालतात तोंवर फिरेल. म्हातारपणीं तुम्हां पुतण्यावांचून कोण पाणी घालणार आहे त्याला?"

तात्या कुठें गेले तें बरेच दिवस कळलं नाहीं. कुणी त्यांचा तपासहि केला नाहीं. शेवटीं कुणी तरी बातमी सांगितली कीं, पांढरीशेजारीं ते एका खेड्यांत रहातात. त्या गांवांत ब्राह्मण नाहीं. म्हणून गांवकऱ्यांनीं ठेवून घेतलं आहे. ग्रामदेवतेची पूजा करतात. जोशीपणा करतात आणि रहातात. आम्ही असतांना तात्यांनीं असं राहूं नये असं मला वाटलं. वाईट वाटलं. शरमहि वाटली!

पुढं अनेक दिवस गेले. दादाना अखेरीचं आजारपण आलं. आम्हीं सारे गोळा

झालों. औषधपाणी चालू होतं. चिंतेनं साऱ्यांचीं तोंडं मलूल झालीं होतीं. या आजारांतून दादा उठत नाहींत असं भावत होतं.

आणि अचानक एके दिवशीं पाठीशीं बोचकं घेऊन तात्या आले. भावाच्या शेवटच्या आजाराच्या वेळीं बोलावणं धाडल्यासारखे आले. अंथरुणावर पडलेल्या दादांकडे बघत उभे राहिले.

दादा म्हणाले,

" कोण कोंडिबा ? तुला कोणी कळवलं ? "

कुठं तरी बघत तात्यांनीं उत्तर दिलं,

" कुणी नाहीं कळवलं. कधीं कुणी कळवलं ? मला माहितच नाहीं. फार दिवस झाले, बघावं वाटलं, म्हणून आलों. "

बस्स. भावाभावांची एवढीच भाषा झाली. मग तात्या विडी ओढीत बसून राहिले. त्यानंतर दादा चार दोन दिवस तरी होते. पण तात्या कधीं त्यांच्यापाशीं बसले नाहींत; बोलले नाहींत. कधीं जातां जातां, वाकडी झालेली उशी, जमिनीवर गेलेला पाय, अंगावरचं पांघरूण नीट करायचे. न बोलतां करायचे ! शेवटीं साऱ्यांनीं आपल्या अश्रूंना वाट दिली. सारेजण खळखळून रडतांना मी पाहिलं. पण तात्यांचे अश्रू मला दिसले नाहींत. या साऱ्या गोंधळांतून ते कुठें रानावनांत गेले आणि गुडघ्यांत मान घालून बसले कीं काय, कोण जाणे ! दुसऱ्याएकीं वाटत असलेली माया व्यक्त करणं तात्यांना जमत नाहीं. झाल्या गोष्टीबद्दलची हळहळ आणि दुःखहि बोलून दाखविणें घडत नाहीं.

दादांच्या मागं घरांत कुणी मोठं माणूस राहिलं नाहीं. भालू मास्तर आठवडाभर नोकरीच्या गांवीं असत. आणि आले तर रविवारीं घरीं येत. एरवीं कुणी पुरुष माणूस नसे. तेव्हां आण्णांनीं तात्यांना सांगितलें,

" कां असे वनवासी होतां ? आपल्या घरीं रहा. दादांची उणीव भरून काढा. "

" राहीन. पण रिकामा बसून काय करूं ? मला दोन बैल द्या घेऊन. शेतांत विहीर द्या पाडून. शेतीभाती बघेन आणि राहीन ! "

आण्णांनीं तात्यांचं म्हणणं ऐकलं. पावाच्या जिराईत जमिनींत पैसा ओतला. विहीर खोदली. ताली टाकल्या. पडून राहिलेला कुणबावा उभा केला. आतां तात्या त्या व्यापांत असतात. म्हाताऱ्यानं आपलं सारं लक्ष आतां कुणबिकीवर केंद्रित केलं आहे. माणदेशाच्या रानांत फुलकोबी, टोमॅटो, कोबी असला

अपूर्वाईचा भाजीपाला पिकविला आहे. कोबीचे गड्डे तयार झाल्यावर भालू मास्तर म्हणाले,

" तात्या, फुलकोबी तयार झाली ही. काढूं का ? "

" होय, झाली खरी. पण आतां चार-आठ दिवसांत पुण्यामुंबईहून पोरं येतील. तीं आलीं म्हणजे काढूं. "

आम्ही जाईपर्यंत तात्यांनीं कांहीं काढूं दिलं नाहीं. मक्याचा हुरडा देखील राखून ठेवला. इकडे मुंबईला यायच्या वेळीं माझ्या पिशवींत चार मुळे, मिरच्या, शेंगा घातल्या. कुणीतरी म्हणालं,

" हें कशाला देतां ओझ्याला ? तिथं का मिळत नाहीं ? "

" मिळतं, पण विकतचं. हें आपल्या मळ्यांतलं आहे ! "

एरव्हीं अस्राप वाटणारे तात्या कधीं बददंडहि दिसतात. पोरांच्या पाठबळामुळें तो झाकला जोर अलीकडे बळावला असावा. बांधाशेजारीं बांध असलेला कुणबी हद्द रेटली म्हणून फुकट घसा फोडूं लागला तर तात्या सबुरीनं बोलत नाहींत. हातवारे करून म्हणतात,

" जा जा, मी बांध रेटला. ज्याच्या मनगटांत नेट आहे त्यानं रेटावा. कोर्ट दरबारांत जा. बघूं कोण माझं काय करतं तें ! "

धाकटा भाऊ काका मवाळ आहे. पण त्याची बायको जहाल आहे. समाईकांतल्या रानांतील वाटणी ती मागूं लागली तर तात्या तिला दटावतात,

" तुझ्या बापाचं इथें काय आहे ? तो येऊं दे मागायला म्हणजे बघूं ! "

चाकरीचा गडी चंदरभान काम चुकवून टिवल्याभावल्या करूं लागला तर त्याची बुटानं पूजा करतात. घरचीं गाडीबैलं कुणीतरी गरजेला मागतात. भिडेखातर भालूमास्तर नाहीं म्हणत नाहींत. न्या म्हणतात. गरजू तात्यांकडे येऊन सांगतो,

" तात्या, कडबा आणायचा आहे. गाडीबैलं नेतों. भालू मास्तर न्या म्हणालेत. "

तात्या चक्क उत्तर देतात,

" भालूमास्तर घरचा बाजीराव ! माझीं बैलं बारा महिने घरचे कष्ट उपसतात. घरचं खाऊन गांवची चाकरी त्यांच्यानं होणार नाहीं ! "

त्यांच्याविरुद्ध जाण्याची कोणाची छाती होत नाहीं. घरीं कुणी त्यांना बोलत नाहीं. कारण लगेच ते धोतरअंथरूण काखोटीला मारून म्हणतात,

" जातों व्यंकण्णाकडे मुंबईला. त्याच्या घरचे कष्ट करून तिथं राहीन. पण हा व्याप आपल्याला खपणार नाहीं ! "

जनावरांना कुणी दगाफटका करील म्हणून तात्या हमेशा बाहेर झोंपतात. एक जाड घोंगडं आणि सतरंजी घेऊन गारव्यांत पडतात. पहांटे उठून बैलांना वैरण टाकतात. चगळचोथा जमा करून अंगणांत शेकोटी करतात आणि मला हांक मारतात,

" ये रे, शेकोटी केलीय ! "

मग पांघरुणाची भाळ घेऊन आम्ही बसतों. तोंडावर येणारा धूर चुकवीत हातापायाचे तळवे शेकतों. मग तात्या कांहीं गोष्टी बोलतात. ते कांहीं बोलणार आहेत याचा अंदाज अगोदर कधींच येत नाहीं. त्यांच्या तोंडावरून कांहींच उमगत नाहीं. एकाएकीं बोलतात,

" तूं मन्सुऱ्या बघितला नाहींस, नाहीं ? "

" नाहीं. तो घेतला तेव्हां मी नव्हतों, आणि आलों तेव्हां विकला होता. "

" फार चांगला बैल. आसपासच्या दहापांच गांवांत तसा बैल नव्हता. पण तापीट फार. दरवाज्यांत माणूस दिसला कीं, फुरफुरायचा. मला एके दिवशीं टाकलं उचलून. पडलों खिळग्यांत जाऊन. आंगठा फुटून चिंध्या झाल्या. पण बोललों नाहीं कुणापाशीं. का करायचंय बोलून ? मारका म्हणून लगीच न्यायचे बाजारांत ! "

" मग अखेर विकला कशाबद्दल ? "

" त्याला परमेश्वरानंच खावूं दिलं नाहीं. पुन्हां रानांत मला घोसळलं. चांगला कासराभर फरफटत नेलं. मग भाल्‌ म्हणाला, ' टाकूं या विकून. ' टाकला झालं ! पण तसा बैल आतां मिळायचा नाहीं ! "

मन्सुऱ्याच्या आठवणीनं तात्या गहिंवरतात.

नवीनच घेतलेल्या शेरडीला एक बोकड झालं आहे. तेंहि तात्यांचं अति लाडकं. त्याला कुठंहि शिरून कांहींहि खायची परवानगी. त्यामुळं मुळांतच माजोरी असलेली ती जात अधिकच उंडारली आहे. कुणी डिवचलं तर दोन पायांवर उभं राहून धडक मारायला कमी करीत नाहीं. एकदां तें बेटं मागल्या

अरुंद आडांतच पडलं. तात्यांच्या जिवाची कोण घालमेल झाली ! काऱ्या खोचून ते आडांत उतरले आणि त्याला घेऊन वर आले. वर येतांच दोन लाथा बधावून त्याला म्हणाले,

"माजलायस लेका ! शिमग्यापर्यंत थांब. तुला देतों चांदभाई मुलाण्याकडे !"

पण चांदभाई मागायला आला, तर त्यांच्या हातून बंड्या देणं व्हायचं नाहीं. मन्सुऱ्या, बंड्या, तशी पुतळी गाय, गंगी म्हैस–साऱ्यांच्याविषयीं तात्यांच्या चित्तांत माया आहे.

इतके दिवस मुशाफरी केली, पण तात्यांनीं संचय कसलाहि केलेला नाहीं. ते सडेफटिंग आहेत. महिन्याकाठीं आठनऊ रुपये पेन्शन मिळतं. त्यांतून विडीकाडीचा खर्च भागतो. पण त्यांतलाहि पै पैसा गांठीला ठेवून, थोरल्या कर्तबगार पुतण्याएकींची माया त्यांनीं व्यक्त केली. चिंध्यापांध्यांत जपलेलं तोळाभर अस्सल सोन्याचं एक वळं काढून अण्णाकडे दिलं आणि म्हणाले,

"हें घाल. असूं दे तुझ्या हाताला !"



# काका

सकाळच्या वेळीं रानांतून पक्ष्यांचीं कोटीं शोधीत हिंडत असतांना मला एक माणूस भेटला. त्याच्या अंगावर मळकीं लक्तरं होतीं. केस बरेच वाढले होते. पाठीशीं बोचकं टाकून पाय फरफटत तो माझ्यापाशीं आला. मला न्याहाळून म्हणाला,

" मला ओळखलंस पोरा ? "

" नाहीं, तुम्ही भिकारी आहां काय ? "

त्याचा उन्हानं कोळपलेला चेहरा दुःखी झाला. कपाळावरचा घाम बोटानं निपटून टाकीत त्यानं उत्तर दिलं,

" मी तुझा काका, विनायक ! "

मी डोळे बारीक करून त्याच्या तोंडाकडे बघितलें.

" मला एक विनायक काका होता खरा. तुम्ही बरेच दिवसांपूर्वीं घरांतून पळून गेलां होतां. बेपत्ता होता, नव्हे ? "

तो थोडका हंसला व म्हणाला,

" हें तुला कसं कळलं ? "

" हं ! गांवांतल्या प्रत्येक माणसाला ही गोष्ट ठाऊक आहे ! "

काकानं माझ्या खांद्यावर हात ठेवला. वाकून म्हटलें,

" पोरा, माणसाचं आयुष्य ही एक मोठी गंमतीदार गोष्ट आहे. मी खोटें सांगणार नाहीं. खरोखर अगदींच बांका प्रसंग आल्याशिवाय मी खोटें बोलत नाहीं. आपलं घराणं तसं चांगल्या माणसांचं आहे. मी अनेक दिवस बेपत्ता आहें ही गोष्ट खरी आहे. पुष्कळ माणसं घरांतून पळून जाऊन अशीं बेपत्ता होतात.

तूं तें मनावर घेऊं नकोस. आपलं घराणं हें अत्यंत हुशार माणसांचं, चांगली परंपरा असलेलं आहे. समजलं ? "

मी मान हलवली.

" मग मला घरीं घेऊन चलतोस ? "

" माझे वडील घरीं नसतात. नोकरीसाठीं त्यांना बाहेरगावीं रहावं लागतं. घरीं फक्त आई आणि मावशी आहे ! "

" तरी चालेल. तुझी आई मला ओळखेल. लहानपणीं तिनंच माझा संभाळ केला आहे. "

त्याचा चेहरा दुःखी झाला. आपले खडबडीत पंजे पाठीमागें धरून त्यानं मान छातीवर टाकली. मला वाटलं तो आतां रडणार. पण पुन्हां मान वर करून तो म्हणाला,

" मला घरीं घेऊन चलतोस ? "

" चल. "

काळ्या रानांतील पायवाट तुडवीत आम्ही गांवांत आलों. तोंपर्यंत एकमेकांशीं बोललों नाहीं. घरीं येतांच काका जोत्यावर बसला आणि मी आंत गेलों. सुंदरा-मावशी आणि आई गोवारीच्या शेंगा नीट करीत बसल्या होत्या. मी म्हणालों,

" आई, बाहेर कोणी माणूस आला आहे. तो म्हणतो कीं मी विनायक काका आहें ! "

आई चटकन् उठली आणि बाहेर आली. पायावरची धूळ झाडीत बसलेल्या काकाकडे बघून म्हणाली,

" तूंच का तो विनायक ? "

काका उठून उभा राहिला. आईला नमस्कार करून म्हणाला,

" होय वहिनी, मीच तो ! "

त्याचा वेष बघून आई कळवळली.

" अगाई, काय रे ही तुझी दशा विन्या ! " पण पुन्हा तिला काय वाटलं कोण जाणे. चेहरा कठोर करून ती म्हणाली,

" फिरून कां आलास तूं माझ्या घरीं ? लहानपणापासून नीट खाऊंपिऊं घालून वाढवला तरी मला न विचारतां पुसतां पळून गेलास, आणि सहा वर्षांनीं आज उगवतो आहेस ! पळून गेलास तो गेलास. जातांना पैसे चोरलेस ! बाहेर

जाऊन कुळाला न शोभण्यासारखा वागलास! तुला भाकरी बडवून घालायला मला बळ नाहीं. तूं कां आलास माझ्या घरीं?"

खालीं मान घालून काका म्हणाला,

"सहज या गावावरून चाललों होतों वहिनी. वाटेंत पोरगा आढळला. मला पुढं जाववलं नाहीं. म्हटलं भेटून यावं सगळ्यांना. तो भेटला नसता तर मी आलों नसतों!"

"उगीच माझ्या पोटांत खडे घालूं नकोस. निघून जा. माझ्या घरांत जागा नाहीं."

"मी घरांत रहाणार नाहीं वहिनी. मी बाहेर झोंपीन. उघड्यावर झोंपायची मला संवय आहे!"

मी म्हणालों,

"कडब्याची खोली चांगली त्यापेक्षां! वारा लागणार नाहीं. तिथं उंदीर आहेत. पण आपण ते मारूं!"

मग आईला दया आली. तिचा आवाज मायाळू झाला. काकाला म्हणाली,

"परसदारीं जाऊन हातपाय धू. वाटल्यास आंघोळ कर. धोतर देतें यांचं, तें नेस, जा."

काका आणि मी परसदारच्या आडावर गेलों. ओढून ठेवलेलं पाणी तिथं नव्हतं. काका म्हणाला,

"पाणी आडांतून काढण्यापेक्षां आडांत उतरूनच आंघोळ केली तर काय होईल?"

कल्पना मला आवडली. क्षणभर मोह झाला. पण मग स्वतःला सांवरून म्हटलें,

"पाणी गढूळ होईल आणि आठवडाभर पितां येणार नाहीं. आईला समजलें तर ती तुला हाकलून देईल."

माझं बोलणं त्याला पटलं. भराभर पोहरे काढून त्यानं अंगावर ओतून घेतले. त्याची आंघोळ होईपर्यंत मी पडक्या भिंतीवर पाय हलवीत बसून राहिलों.

पुढच्या ओसरीवर येतांच आईनें केळीच्या पानांवर भाकरी आणि चटणी घालून तें काकाला दिलं. जोत्यावर बसून तो खाऊं लागला. मोठमोठे घास घेऊं लागला. आई त्याच्याकडे बघत कांहीं वेळ उभी राहिली. मला खुणावून आंत

गेली. मी पाठोपाठ गेलों. कुलपांत ठेवलेला डबा काढून आईनें दोन लाडू माझ्या हातावर ठेवले आणि म्हटलें,

" हे दे जा त्याला. "

मी बाहेर पडलों आणि एक लाडू चड्डीच्या खिशांत घातला. दुसरा काकाला देऊन म्हटलें,

" आईनं दिला. "

तो हंसला. म्हणाला,

" आपलं घराणं हें अत्यंत चांगल्या लोकांचं आहे. बघ! " मी मान हलवली आणि वैरणीच्या खोलींत गेलों. लाडू खाऊन परत आलों.

काकानं जेवण आटपलं होतं. केळीचं पान चुरगाळून फेंकीत तो म्हणाला,

" मला आतां झोंपायचं आहे. "

त्याला घेऊन मी वैरणीच्या खोलींत गेलों. खालीं चगळ अंथरून काका झोंपला आणि घोरूं लागला. मीहि त्याच्या शेजारीं पडलों. कांहीं वेळानं उंदीर आले आणि काकाच्या पायाचा अंगठा कुरतडूं लागले. मी उठलों आणि हातांत लाकूड घेऊन उंदराला बडवूं लागलों. चार रट्टे पायावर बसतांच काका जागा झाला आणि म्हणाला,

" माझा पाय मोडणार आहेस का? "

" नाहीं. उंदीर तुझा अंगठा खात होते. त्यांना मी मारत होतों! " मान हलवून काका म्हणाला,

" उंदीर असे मरत नाहींत. "

मग त्यानें आपला फाटका अंगरखा अंगांतून काढला. पेंढीच्या आड आम्ही छपून बसलों. दोन तीन उंदीर बिळाच्या बाहेर आले. आणि इकडे तिकडे हिंडूं लागले. तेव्हां चपळाईनं काकानं अंगरख्याचा बोळा कोंबून बीळ बंद केलं. हातांत लाकूड घेऊन तो बिळापाशीं उभा राहिला व मला म्हणाला,

" पेंढ्या हलवून उंदीर हुसक! "

मी तसें करतांच उंदीर भ्याले आणि सपाट बिळाकडे पळाले. आंत शिरण्यासाठीं अंगरख्यांत तोंडें ढोसूं लागले. पण काकानं दोन्ही हातानी धपाटे घालून त्यांचा जीव घेतला!

तिसरा प्रहरपर्यंत खोलींतले जवळजवळ सगळे उंदीर आम्ही मारले आणि आमच्या मांजरीला खाऊं घातले. तिला एकटीला ते संपले नाहींत. तेव्हां शेपूट धरून काकानें ते हवेंत उडविले आणि कावळ्यांनीं पळविले !

काका आमच्या घरींच राहिला. घरांत कुणी जाणतं पुरुष माणूस नव्हतं. त्यामुळं आईनं त्याला ठेवून घेतलं. नीट वागेन अशी हमी त्याच्याकडून घेतली आणि ती काकानं दिली. शेवटीं धीर करून त्यानं आपली अडचण सांगितली,

" वहिनी, मला पांचशें रुपये कर्ज आहे. तें चुकविण्यासाठीं मी असा लमाणासारखा गांवोगांव हिंडतों. तेवढं कर्ज भागवलं तर मी निर्वेधपणानं इथं राहीन. तुमच्या घरांतील पडतील तीं कामं करीन आणि तुमचीं पोरं खाऊन उरेल तें अन्न खाईन. "

आई संतापली. म्हणाली,

" कांहीं नको माझ्या घरीं रहायला. तूं चालता हो. तुला पोसूं ते पोसूं आणि आणि वर मेल्या तुझं कर्ज फेडूं ? आम्ही काय जहागीरदार लागून गेलोंय् होय रे ? पाचशें रुपये आणूं कुठनं ? घरदार गहाण टाकूं माझं ? "

आई अशी तोडून बोलली खरी, पण मागून तिचं तिलाच वाईट वाटलं. ' बिचारं पोर वनवासी आहे. या जगांत आमच्याशिवाय आपलं म्हणायला कोण आहे त्याचं ? नडी अडचणीला आमच्याशिवाय कुणाच्या तोंडाकडं बघावं त्यानं ? पण आमचा संसार हा असा. पांचशें रुपयांची सवड कशी आणि कुठून काढायची ? ' असं तिला वाटलं. पण पुन्हां, ' कांहींही करून विन्याचा गुंतलेला गळा मोकळा केला पाहिजे, नाहीं तर त्याच्यावर वारंट निघेल, बिचारा तुरुंगांत बसेल, ' अशा विचारानं ती कळवळली आणि मावशीला म्हणाली,

" सुंदरे, मला पांचशें रुपये उसने दे तुझ्याजवळचे. मी ते बेताबातानें फेडीन ! "

सुंदरामावशीचा नवरा लहानपणींच उलथला होता. त्याचा पैसा तिच्यापाशीं होता. बहिणीच्या आधारावर ती रहात होती. तिला नाहीं म्हणवलें नाहीं.

" मी देतें ग, पण तूं अनाठायीं माया ओतली आहेस. हा भणंग पैसे घेईल आणि पुन्हां कुठंतरी परागंदा होईल. एखादी बाई पुन्हां ठेवील. चैन करील आणि पैसे उडाल्यावर पुन्हां तुझ्या दाराशीं भिकाऱ्यासारखा येईल ! "

" बाई, त्याचा शब्द त्यापाशीं. आपल्या हातून होईल तेवढं करावं. नीट

राहिला, चांगलं वागूं लागला, तर ‘ इकडं ’ही समाधान होईल. तेवढाच भाऊ आहे. ”

अखेर मावशीनं पैसे दिले. ते घेऊन काका चार दिवस नाहींसा झाला. परत आला तो नीटनेटके कपडे घालून. येतांना माझ्यासाठीं जरीची टोपी, आईसाठीं चोळीचें कापड घेऊन आला. म्हणाला,

“ वहिनी, कर्जदाराच्या मढ्यावर पैसे ओतले. त्यानं थोडी सूट दिली. त्यांतून या जिनसा आणल्या. आतां माझ्या जीवाला कसलाही घोर नाहीं ! ”

आई म्हणाली,

“ बरं झालं बाबा. आतां नीट रहा. वाटलं तर कुठं काम धंदा कर. नाहीं तर शेती-भाती बघून रहा. मला तूं कांहीं जड नाहींस. यांच्या मागं इथं कुणी पुरुष माणूस नाहीं. सगळं मला बघावं लागतं. तूं रहा. अरे, कां असा भणंगासारखा हिंडतोस ? जन्म कां फुकट घालवतोस ? ”

आईचं बोलणं काकाला पटलं. तो आमच्या घरीं राहूं लागला. हळूहळू घराचा सगळा कारभार त्यानं आपल्या हातीं घेतला. बाजारहाट करणं, पैशाच्या देव-घेवींचे व्यवहार करणं, आडांतला गाळ काढून घेणं, घराची डागडुजी करणं वगैरे गोष्टी काका बघूं लागला. नीट रीतीनं बघूं लागला. या सर्व कामांतून त्याला मोकळा वेळ खूपच मिळे. मग तो हातांत बोरीचा वाळला ढापा घेई आणि म्हणे,

“ पोरा, पाकोळ्या फार झाल्यात घरांत. उंदरासारखा त्यांचाही निकाल लावूं ! ”

संध्याकाळ झाली कीं वळचणींत बसून राहिलेल्या काळ्या पाकोळ्या बाहेर पडत आणि सोप्यांतून, अंगणांतून भिरभिरूं लागत. बोराटीचा फांजर उगारून काका साऱ्या घरांतून सैरावैरा धांवे. भिरभिरणाऱ्या पाकोळ्या त्यांत अडकत. बोरींचे वाकडे कांटे त्यांच्या पातळ पंखांतून घुसत. आपलीं उंदरासारखीं तोंडं वासून त्या ‘ ची ची ’ करून ओरडत. सुंदरामावशी पडवींत उभ्या राहून, काकाच्या या पराक्रमाकडे कौतुकानं बघत.

कधीं गांवाबाहेर लाकडाच्या ओंडक्यावर बसून काका विड्या ओढी. मलाही देई. संध्याकाळच्या थंड वेळीं विड्या ओढायला मोठी मजा येई. काका म्हणे,

“ तुझी मावशीही मोठी चांगली बाई आहे. खरोखरीच अशा बायका फार थोड्या असतात ! ”

" चांगली म्हणजे कशी काका ? "

काकाचे डोळे मोठे होत. माझं मानगूट हातांत पकडून तो मला गदागद हलवी. म्हणे,

" अरे साल्या ! माझ्यापाशीं हुषारी दाखवतोस ? "

आणि मोठमोठ्यानं हंसे. साळूच्या रंगदार लावण्या म्हणे. त्या लावण्या ऐकणें मला आवडे. कारण त्यांत फाजीलपणा असे आणि मजामजा असे. अंधार पडून दिसेनासें होई, तेव्हां काका भानावर येई आणि मला म्हणे,

" गाढवा, बारा विड्या ओढल्यास कीं ! तूं पोर नाहींस. हैवान आहेस ! चल घरीं. तुझ्या आईला कळलं तर ती तुला आणि मला दोघांनाही जोडयानं मारील ! "

आमची मावशी ही माझी सख्खी मावशी नव्हती. आईची कसली तरी बहीण होती एवढंच ! तिचा नवरा मेल्यापासून ती आमच्याकडेच होती. नाकींडोळीं नीटस असलेली ही बाई उंचीनं ठेंगणी आणि अंगानं भरलेली होती. पिकलेल्या पेरूसारखा तिचा चेहरा होता. ती फारशी घराबाहेर पडत नसे. रात्रीं झोपते वेळीं मनाचे श्लोक आणि हरिपाठ म्हणण्याचा तिचा परिपाठ होता. घरांतले दिवे विझवले जात. मी आणि काका अंगणांत चांदण्या बघत पडलेले असं तेव्हां अंथरुणावर बसून मावशी हरिपाठ म्हणे. तिचा आवाज कोमल होता. मी कुशींत डोचून काकाला सांगूं लागलों कीं,

" काका, तारा तुटला बघा ! "

तर तो माझ्याकडे लक्ष देत नसे. म्हणे,

" चूप ! गडबड करूं नकोस. मावशी देवाचं म्हणतीय ना ? "

मावशीच्या भोंवतींभोंवतीं घुटमळत रहाणं काकाला आवडूं लागलं. तिच्या वांटणीचीं कामं तो आवडीनं करूं लागला. आई बाहेर गेली म्हणजे तीं दोघं कुचूकुचू बोलत. मावशी आडावर धुणं धुवूं लागली कीं काका पाणी शेंदून देई. आडाचं पाणी अमळ मचूळ लागे. पिण्यासाठीं ओढ्याची एखादी दुसरी घागर आणावी लागे. ती आणण्यासाठीं मावशी गेली कीं काका पाठीमागून जाई आणि निम्यांतून घागर स्वतः आणी. आंघोळीनंतर स्वतःचं धोतर स्वतः धुण्याचा काकाचा शिरस्ता होता. पण अलिकडे कधींमधीं मावशी साबण लावून काकाचं धोतर धूत असे. जेवायला आम्ही दोघं बसलों म्हणजे तुपाची थोडी जास्त धार

काकाच्या भातावर वाढण्याकडे मावशीचा कल असे. आणि मग खुषींत येऊन काका माझ्यापाशीं म्हणे,

"तुझी मावशी ही खरोखरीच फार चांगली बाई आहे!"

मी कांहींएक न बोलतां त्याचं म्हणणं ऐकत होतों. अजाण म्हणून माझ्या देखत कांहीं बारीक सारीक मजा तीं दोघं करत, तेव्हांही मी आपल्याला कांहीं विशेष वाटतं आहे, असं मुळींच दाखवत नसें. आईच्या देखत तीं दोघं अगदीं सावधगिरीनं वागत. उलट, मावशी काकाविषयीं कुरकुरच करी. काकाही, ही बाई घरांत आहे हें कांहीं आपल्याला पसंत नाहीं, अशा तऱ्हेनेंच वागे. आणि बिचारी आई हें सगळं खरं मानी! तिला चुकूनही कसला संशय आला नाहीं.

एकदां दुपारच्या वेळीं आई कुणाकडे बसायला गेली. तिच्या पाठोपाठ मीही बाहेर पडलों. मावशी ओटीवर आडवी झाली होती आणि काका वैरणीच्या खोलीपाशीं बसून अंगरख्याला गुंड्या लावीत होता.

मी वाड्याबाहेर पडलों. गावांभोवतीं एक चक्कर मारून आलों. वाड्याचा मोठा दरवाजा बंद होता. वैरणीच्या खोलीला असलेल्या जाळींतून आंत बघण्यासाठीं मी धडपडलों. जाळी उंच होती. माझे हात पोचेनात. भिंतीच्या सावलीला रेडकू डोळे मिटून बसलं होतं. त्याला कानाला धरून जाळीखालीं आणलं. त्याच्यावर उभा राहिलों आणि जाळीला लोंबकळलों.

माझ्या होऱ्याप्रमाणें काका आणि मावशी आंत होतीं. हात अवघडेपर्यंत मी लोंबकळत राहिलों आणि मग खालीं आपटलों. संध्याकाळीं आईला एकटी गांठून हा सर्व प्रकार मी गंभीरपणानं सांगितला. पण लहानपोराच्या गंभीर बोलण्यावर मोठ्या माणसांचा विश्वास बसत नाहीं. आई चिडली आणि मला दोन धपाटे घालून म्हणाली,

"हलकटा, पोर कीं भूत आहेस! कुणी शिकवलं रे तुला हें घाणेरडं बोलणं? म्हणशील का असं पुन्हा? आं! थांब. डाग देतें तोंडाला चांगला तापल्या पळीनं!"

मी दुःखी मनानं तिचं बोलणं ऐकलं. मार निमूटपणें घेतला. गांवाबाहेर पडलों. काका ओढ्याकाठानें म्हैस हिंडवीत होता. त्याच्यापाशीं जाऊन म्हणालों,

"काका, मला विड्या दे. मला फार त्रास झाला." खडकावर बसून विडी ओढत काका बोलला, "पोरा माणसाचं आयुष्य ही एक मोठी गमतीदार गोष्ट

आहे. जीवन हें त्रासदायकच आहे; पण आपण त्याचा विचार करूं नये. मी कधींही करत नाहीं! मी मेल्यानंतर लोक जेव्हां तुला विचारतील कीं 'तुझा काका कसा होता?' तेव्हां तूं सांग कीं तो एक थोर माणूस होता. चार माणसं जगतात त्यापेक्षांही वेगळं तो जगला. चार माणसं करतात त्या चिंता आणि दुःखं त्यानं कधींच केलीं नाहींत —"

आणखी काका खूप बोलला. बोलतांना त्याचे डोळे बारीक होत होते. आवाज कणखर येत होता. पण त्याचं बोलणं ऐकून घेण्याच्या मनःस्थितींत मी नव्हतों. समोर वहाणाऱ्या धारेंत शेपट्या हलवीत तरंगणाऱ्या माशांकडे बघत मी विचार करीत होतों कीं, लहान मुलंही खरं बोलतात हें आईला कसं पटवावं?

आईनं मला जामला खरा, पण तिनंही कांहीं जाणलें असावें. त्या दिवसापासून ती काळजी घेऊं लागली. मावशी आणि काका फारसे एकत्र येऊं नयेत, अशी वागूं लागली. देवाधर्माला जातांना ती मावशीला बरोबर नेऊं लागली. काकाला स्वतः जेवायला वाढूं लागली. वरचेवर कामासाठीं बाहेर पिटाळूं लागली. तिच्या या खबरदारीमुळं मावशी-काकांच्या भेटी होईनाशा झाल्या. दोघंही नाराज दिसूं लागलीं. मनीं झुरूं लागलीं.

मग एके दिवशीं मावशी आईला म्हणाली,

"बाई ग, तुझ्या घरीं किती दिवस राहूं मी? मी आपली वेगळी रहातें. विठोबाच्या देवळापाशीं एक खोली मिळतीय् भाड्यानं. ती घेतें आणि रहातें."

आईनं ओळखलं. पण ती बळेंच म्हणाली,

"सुंदरे, तुला संकोच का वाटतो माझ्याकडे रहायला?"

"अग संकोच कशाचा? पण माझं हें जन्माचं आहे. तुझे उपकार किती घ्यायचे? तूं अवघड वाटून घेऊं नकोस. मला परवानगी दे."

"एकटी दुकटी कशी रहाशील?"

"आहे देवाची सोबत! आणि तूं का कुठं दूर आहेस? येत जाईन. बसत जाईन."

आईनें संमति दिली. आपल्या घरांत भ्रष्टाकार नको म्हणून होकार दिला आणि सुंदरामावशी चंबूगवाळें आवरून देवळाजवळच्या खोलींत रहायला

गेली. जातांना तिचें सामान नेण्याचें काम मीं आणि काकानं केलं. आई जातांना म्हणाली, " सुंदरे, तुझे पैसे आहेत हं माझ्या ध्यानांत. या सुगीला देईन. त्याची काळजी नको ! "

" दे ग सावकाश. तुझ्याकडचे पैसे जातील काय कुठं ? "

अशी बोलाचाली झाली आणि मावशी आमच्या घरांतून गेली.

त्यानंतर मी काकाची मनःस्थिति बघत होतों. मावशी गेल्यामुळं तो फारसा नाराज झाला नाहीं. मी एकदां म्हणालों,

" काका, मावशी गेली. आतां तुला करमत नसेल ! "

तेव्हां माझा कान पिरगाळून तो म्हणाला,

" साल्या, न करमायला रे काय झालं ? मी ओळखतों, तुला काय वाटतंय् तें ... "

आणि मग तो एकाएकीं गंभीर झाला. बोलला,

" काय रे, तुझ्या आईला कांहीं संशय आला का ? "

" मला कसं कळणार तें ? "

" अच्छा, तुला कळत नाहीं का ! अरे, तूं दिसतोस उंदरासारखा, पण तुला समज चांगला आहे. इतक्या लहान वयांत तूं असा, तर मोठेपणीं काय होशील ? "

मी म्हणालों,

" तुझ्यासारखा होईन काका ! "

त्यावर काका चेकाळला. त्यानं मला खालीं वांकवलं. माझ्या पाठीवर हात टेकवून अल्लाद उडी मारली. बेडकासारखा तो पलिकडे गेला. पार नाहींसा झाला.

माझ्या समजुतीप्रमाणं काका चोरून मारून मावशीकडे जात होता. एकदोनदां पाळत ठेवून मी त्याला मावशीच्या घरांत शिरतांना बघितलंही. पण मी ही गोष्ट आईपाशीं बोललों नाहीं. कारण तिला ती खरी वाटली नसती.

एके दिवशीं गव्हले करण्यासाठीं बोलवायला म्हणून आई मावशीकडे गेली. दार बंद होतं. तिनं ढकललं तर आंत काका आणि मावशी ! ती पाय पसरून बसलेली आणि तिच्या मांडीवर डोकं ठेवून काका पसरलेला ! हें चमत्कारिक दृश्य बघतांच आई दचकली. दार ओढून घेऊन त्याच पावलीं गरकन् परत फिरली. घरीं आली ती गोंधळल्या अवस्थेंत, बडबडत ...

" बाई, असलं कधीं जन्मांत मीं बघितलं नव्हतं ! मेलीचं वय काय हें

असले चाळे करण्याचं ? पोरगं म्हणालं तेंच खरं. मीं विश्वास ठेवला नाहीं. पण आज प्रचीति आली. राम राम . . . हें काय वागणं झालं ! ही काय तऱ्हा झाली ?"

मी जळत्या उदबत्तीनं कागदावर नांव काढीत बसलों होतों. ही बडबड ऐकून म्हणालों,

" काय ग आई ? कुणाची तऱ्हा ?"

तशी ती चुलींतलीं लांकडं बाहेर ओढून त्यावर पाण्याचा सपकारा मारीत म्हणाली,

" कपाळ माझं !"

दुसरे दिवशीं मावशी तरातरा आमच्या घरीं आली आणि आईला म्हणाली,

" कां ग, काल तूं घरीं आलीस तेव्हां तुला कांहीं वाईट दिसलं का ?"

आई म्हणाली,

" तूं विचारती आहेस यांतच सारं कळतंय् कीं ! त्याचा उच्चारच कशाला करायला पाहिजे ?"

मावशी खजील झाली आणि निघून गेली. काका खालीं मान घालून घरीं आला, तेव्हां आई रागानं म्हणाली,

" विन्या, बरी फेड केलीस हो माझ्या उपकाराची ! छान केलंस !"

त्यावर निगरगट्ट काकानं विचारलं,

" काय झालं वहिनी ?"

" मेल्या विचारतोस आणखी ? काल सुंदरीच्या घरांत कशाला गेला होतास ? शेण खायला ?"

" तुमचा समज आहे वहिनी. पण तसं कांहीं नाहीं."

" मग मांडीवर डोकं ठेवून कशाला पासलला होतास तिच्या ?"

" आपलं सहज !"

" सहज काय ? मी एवढा पोटच्या पोरासारखा संभाळला तुला. माझ्या मांडीवर डोकं ठेवावं असं नाहीं रे कधीं वाटलं तुला ?"

" खरंच, वहिनी. तसं कांहीं नाहीं !"

आई एकदम उसळली,

" विन्या, पाप करतोस तें करतोस आणि तें लपवतोस का ?"

तिनं मला ओढून काकापुढं केलं आणि म्हटलं,

" याच्या डोक्यावर हात मारून सांग, मी पापी नाहीं म्हणून ! "

काकाचा चेहरा गोरामोरा झाला. उठून उभा राहून तो म्हणाला,

" पोराच्या डोक्यावर हात मारणार नाहीं मी वहिनी. तुम्ही म्हणत असाल तर मी तुमच्या घरांत रहात नाहीं. निघून जातों. "

आणि तो तरातरा बाहेर पडला.

त्यानंतर काका फिरून घरीं आला नाहीं. ओढ्याकाठीं म्हैस हिंडवतांना मला एकवार भेटला. म्हणाला, " पोरा, मी आतां इथून जाणार आहें. पण माझे शब्द लक्षांत ठेव ! आपलं घराणं हें चांगल्या माणसांचं घराणं आहे. हां, एखाद्या वेळीं आपल्यापैकीं कुणाला गाढवासारखं वागावंसं वाटतं, पण तें साहजिक आहे. पुष्कळ चांगलीं माणसं अशीं वागतात ! काय ? "

मी मान हलवून होकार दिला.

अखेर खाऊसाठीं चार आणे माझ्या हातावर ठेवून काकानं माझा निरोप घेतला. तो गांव सोडून निघून गेला. मावशीहि त्याच्याबरोबर गेली.

त्यानंतर कित्येक दिवस त्यांचा कांहीं ठावठिकाणा आम्हाला ठाऊक नव्हता. सुंदरी आणि काका कुण्या मुलखांत जाऊन राहिलीं होतीं परमेश्वर जाणे ! हळू हळू आम्ही ती सर्व भानगड विसरलों. आईही विसरली. त्याची कधीं आठवणही घरांत निघेनाशी झाली.

आणि मग एके दिवशीं सकाळीं काका अचानक आला. आला तो पहिल्या खेपेस आला तसा. केस वाढलेले, कपडे फाटलेले ! येऊन ओसरीवर पाय झाडीत बसला. आई दिसतांच पायां पडला.

इतके दिवस मधीं गेल्यामुळें आईचा राग थोडा कमी झाला होता. ती म्हणाली,

" विन्या, पुन्हां आलास का माझ्या पोटांत खडे घालायला ? काय रे ही तुझी दशा ? "

काका म्हणाला,

" वहिनी, प्रपंच वाढलाय. फार ओढाताण चालली आहे माझी. सुंदरी दिवसांत आहे तिसऱ्या खेपेनं. "

आई उसळून म्हणाली,

" हात् मेल्यांनो. जा, चालता हो ! तिकडंच काळं कर ! अभद्र तोंड घेऊन पुन्हां येऊं नकोस माझ्या दाराशीं. जा ! ऊठ ! "

काकानं धोतराच्या सोग्यानं, उन्हानं काळवंडलेलं तोंड पुसलं आणि खालीं मान घालून हलक्या आवाजांत म्हटलं,

" जातों वहिनी, पण सुंदरीचे उसने घेतलेले ते ' पांचशे रुपये ' तेवढे द्या ! त्यासाठीं मुद्दाम आलोंय मी !! "



# कालगति

साठाला गांठत आलेले मास्तर भिंतीशीं टेकून बसले होते. त्यांनीं पायाची अढी घातली होती आणि दोन्ही हातांच्या बोटांनीं खालीं जमिनीवर ठेका धरला होता. मानही त्या ठेक्याबरोबर हलत होती.

पन्नाशीच्या जवळपास आलेली ताई त्यांच्या समोरच्या भिंतीशीं बसली होती, हाताच्या मुटक्यावर गाल टेकून कुठंतरी बघत.

रॉकेल तेलाची चिमणी चुलीपाशीं बसून धूर ओकीत होती. खोपटांतलं दारिद्र्य उजेडांत आणीत होती.

ओल चढलेल्या भिंती, ओबड धोबड बांधणीच्या आणि बुटक्या. त्यांच्या अंगांत मारलेल्या खुंट्यांना कुठं टेकून तिचं चिंध्यांचं बोचकं, तोंडाला दोरी बांधून अडकवलेल्या हिरव्या-निळ्या रंगाच्या बाटल्या, ढोलकं, तुणतुणं, तर कुठं एखादा जुना कोट-अंगरखा लोंबकळत असलेला. एक खुंटी म्हणून रिकामी नाहीं; उलट जागजागीं खिळेमोळे मारून त्यांना कांहींबाहीं टांगलेलं. आणि मग इतर कांहीं पसारा कोनेकोपरे व्यापून राहिलेला. चुलीच्या आसपास चार दोन भांडींकुंडीं, फुटकीं - तुटकीं, हलकीं.

पलिकडे एका कोपऱ्यांत एक मोठं खोकं. कधीं लहर लागली म्हणजे, त्या जीर्ण खोपटांत एखाद्या तटकरावर पालथी मांडी ठोकून मास्तर लिहायला बसत. उघडे वाघडे, शेंडी गोंजारत आणि दाढी खाजवत. तासन्-तास त्यांची लेखणी चाले आणि एखादी फैनाबाज लावणी, छक्कड, किंवा खटकेबाज झगडा जन्माला येई. कानावर लेखणी ठेवून, झोकांत बसून ते लिहिलेलं पुनः स्वतःशींच वाचीत, मान डोलवीत गुणगुणत. त्यांचा सुरकुतलेला चेहरा क्षणभर टवटवीत

होई. चुलीशीं लाकडं फुंकत, धूरभरल्या डोळ्यांची उघडझांप करीत बसलेल्या ताईला उत्तेजित स्वरांत ते म्हणत,

" अग ताई, बघ कशी सुरेख लावणी झाली! ऐकणारे नागासारखे डोलले पाहिजेत. म्हणणाऱ्याचा गळा मात्र असा पाहिजे ... यँव् रे यँव्! "

पण मास्तरांच्या या बडबडीपेक्षां तिचं ध्यान चुलींत अधिक. ती आपली कांहीं न बोलतां तोंडाचा चंबू करून लाकडं फुंकत राही.

असं जन्माला आलेलं सगळं शब्दभांडार गांवोगांव महारापोरांच्या तोंडांत होतं. महाराष्ट्रभर तमाशाच्या कनातींतून फडाफडांतून गाइलं जात होतं.

— ताईनं गालाचा हात काढला. डोक्यावरचा जुनेऱ्याचा पदर सारखा करीत आणि तेलाअभावीं कोरडे झालेले केस सांवरीत ती बोलली,

" भाकरी घ्या खाऊन! भुका न्हाई का लागल्या?" आणि तिनं जांभई दिली; मुंग्या आलेल्या पायाची घडी मोडली.

मास्तरांनीं ठेका थांबवला. मिटलेले डोळे उघडून विचारलं,

" मला कांहीं म्हणालीस ताई?"

" व्हय, म्हनलं रात झाली, भाकरी घ्या खाऊन — "

दोन्ही हात जमिनीवर टेकून आणि ' अग बया ' करून ती उठली. काश्याच्या थाळींत एक दीड भाकरी चटणी घालून तिनं मास्तरांपुढं सरकवली. पाण्याचा लोटा भरून दिला.

मास्तरांनीं हात धुतले. चूळ भरली.

" तूं ग? खा कीं माझ्या बरोबर ... ! "

" मीबि कशास बसतिया. खातीच की !"

लोट्यांतलं थोडंसं पाणी घालून तांबड्या मिरच्यांचा तो भुकटा मास्तरांनीं ओलावला आणि ते खाऊं लागले, खालीं मान घालून.

ताईनं हातावरच भाकरी घेतली.

कुणीच बोललं नाहीं. मनं कुठंतरी भटकत होतीं. हात केवळ सरावानं आपलं काम करीत होते...

" या बाई, ध्येनांतच न्हाई –" भाकरी खालीं ठेवून गडबडीनं ताई उठली. " गुळाचा खडा असंल वाइसा. काय तरी गोड असावं आज ... "

एका गाडग्यांतून तिनं गुळाचा खडा काढला. फोडला. मोठा भाग मास्तरांच्या पितळींत टाकला. लहान आपल्या भाकरीवर ठेवला.

या तिच्या कृतीवर मास्तर केवळ हसले, विषादपूर्ण हसले. बुटक्या दारांतून बाहेरच्या अंधाराकडे बघत राहिले. त्यांचा हात थांबला होता.

पण ताईच्या ध्यानांत तें आलं नाहीं ...

वरच्या वाश्यांत पाल चुकचुकली. उंदीर धडपडले; कचकचले. जेवणं संपलीं.

अंगांतला खाकी कोट छातीशीं आवळून मास्तर पुनः पहिल्या ठिकाणीं बसले. कार्तिकांतली थंडी. त्यांत पाणी पोटांत गेलेलं...

ताई उंबऱ्यावर बसून पितळी, लोटा विसळूं लागली. आजूबाजूच्या महारांच्या खोपटांतून दिवे उजळले होते. पोरं ओरडत होतीं. दूर कुठं तालेवारांच्या घरांपुढं दारू उडत होती. आकाशदिवे झुलत होते. झुलोत बापडे ... !

उजळलेलीं भांडीं घेऊन ताई आंत आली, तेव्हां चिमणीची फडफडती ज्योत मंदावली होती; बारीक झाली होती. खोपटांतल्या अवकळेचं तोंड काळं पडत चाललं होतं.

भांडीं नीट ठेवून झालीं तरी हें ताईच्या ध्यानांत आलं नाहीं. पदरानं तोंड झांकून तीहि बसली. ऊब यावी म्हणून अंगाचा संकोच करून बसली.

ज्योत अगदींच आकसली.

"हिला का झालं रांडला?" स्वत:शींच पुटपुटत ताई बसल्याबसल्याच पुढं सरकली आणि तिनं चिमणी हलवून पाहिली.

"उडालं का त्याल? उडालं जनू ... !"

तेल नव्हतं हें माहिती असूनही तिनं बाटली काढली. पाहिली.

"का करावं ह्या काराला ... आता कुठं बघावं तरी ..."

आणि सांदी कोनाडे चाचपूं लागली. उगाचच.

मास्तरांच्या तें ध्यानांत आलं.

"काय ग?" हनुवटी वर करून त्यानीं विचारलं.

"त्याल उडालं चिमनीतलं. का करावं ह्या काराला ... कुठं जावं तरी मागायला ... !"

हें ऐकतां ऐकतांच मास्तरांना वाटलं, आपण खिशांत हात घातला आणि चार सहा आणे काढून ताईच्या हातावर ठेवले. नुसतं वाटलंच. प्रत्यक्षांत शक्य नसलेली गोष्ट ते आपले चटकन् कल्पनेनं करून मोकळे झाले ! हात झाडून, कोट सावरून बसले.

ताई बोलत होती. कावून कातावून कांहींबाहीं बडबडत होती. म्हणत होती,

" कशाला पायजे दिवा तरी...कशाला ? आतां का करायचं हाय उजेडानं...? पडुं या अंधारांत पटकुरं घेऊन. जाऊं दे गेली तर ... "

मास्तर उगाचच चुळबुळले. अंगाखालचं तटकर मारखं करीत तोंडांतल्या तोंडांत पुटपुटले,

" व्हय वं ? पडूं या. का करायची चिमणी ? आँ ? "

ताईनं पुन्हा विचारलं तसं म्हणाले,

" ताई, आज नांदत्या घरांत अंधार नसावा. दिवा पाहिजे. "

" पायजे व्हय, पन का करावं ? कुटं जावं ? "

मास्तरांनीं दाढी खाजविली. शेंडीवरून हात फिरवला. ते विचार करीत असावेत.

" डोळ्यांत उगाळून घालीन म्हटलं तर पैसा न्हाई जवळ आतां. उधार पाधार तरी कोन देतया ! " ताई बोलत होती. कांहींतरी शोधीत होती.

उधार कोण देणार ? जवळ पैसा कुठला ? आजपर्यंत चाललं होतं कसंबसं ताईच्या कमाईवर, तिच्या कुणग्यावर. पण तें किती दिवस पुरणार मास्तरां-सारख्या तमासगिराला ? सगळं संपलं. अंगावरचं किडुकमिडुक, भांडीकुंडीं, सगळं. आतां कांहीं राहिलं नव्हतं अगदीं... धंदा नाहीं. उद्योग नाहीं. नवीन कमाई नाहीं. आतां सद्दी संपली होती. आतां महारपोरं ' मास्तर, चाल सांगा. मास्तर वग रचून द्या ' म्हणून येत नव्हतीं, जात नव्हतीं. कुणी विचारपूस करीत नव्हतं. कुत्रंसुद्धां !

पुनः एकवार मास्तर चमत्कारिकपणें हसले. म्हणाले, " ताई, आज नांदत्या घरांत अंधार नको. दिवा पाहिजे. तेल आण वाण्याकडून. ऊठ ! "

" कसं आणूं ? त्याला देऊं काय ? "

" हें बघ, त्या खोक्यांतले वरचे वरचे बघून कागद घे, चांगले बक्कळ घे, वाण्याला म्हणावं, ही रद्दी घे आणि चिमणीभर तेल दे. "

" आँ ? कामाचं हैत न्हवं ते ... लिवल्यालं हैत न्हवं ?"

" नाहींत. जा. चांगले इतके घे ! " मास्तरांनीं दोन्ही हातांनीं जाडी दाखवली. " चार दिवस पुरण्याइतकं तेल आण. जा, ऊठ. आणि हें बघ, विड्याहि आण चारदोन आल्या तर... ! "

ताई उठली. मास्तरांनीं आजूबाजूला हात फिरवला. विडीचं एक थोटूक सांपडलं. विझत आलेल्या चिमणीवर त्यांनीं तें पेटवलं. अंधार झाला. चिमणी घेऊन ताई बाहेर पडली.

अंधारांत विडीचं लाल टोक चमकूं लागलं ; तटतटूं लागलं. काळा करडा धूर गिळल्यावर मास्तरांच्या डोक्यांत शिणशिण्या आल्या.

हाताला चटका बसेपर्यंत ओढून त्यांनीं तें थोटूक विझवलं आणि मग ते डोळे मिटून स्वस्थ पडले ... अंधारांत ... एकटे ... पुण्याच्या महारवाड्यांतलं जीर्ण खोपट सोडून ते निघून गेले. कितीतरी अंतर चालून गेले ... कितीतरी वर्षं मागं टाकून गेले. त्यांच्या खेड्यांत, रेठऱ्याला गेले ...

* * *

... त्यांनीं दप्तर घाईघाईनं गुंडाळून ठेवलं आणि पायांत जोडा सरकावून चावडीचं जोतं उतरलं. कुणीसं म्हटलं—

" रामराम तलाठीसाब ! "

तेव्हां उपरणं सावरलं. आपल्या भल्यामोठ्या वाड्याचा दरवाजा ओलांडून ते आपल्या अंगणांत गेले, तेव्हां जोत्याला बांधलेलं उमदं घोडं फुरफुरलं आणि टापेनं माती उकरूं लागल. सोप्यांत अडकविलेल्या पिंजऱ्यांतला पोपट दांडीवर उड्या मारीत शीळ घालूं लागला —

" रावसाहेब आले ! रावसाहेब आले ! बाई ... "

त्याच्या बोलण्यानं सावध झालेली सावित्री उगीचच आंतून बाहेर आली आणि बाहेरून आंत गेली. तिचा तो डाव ध्यानांत घेऊन मास्तर खुषींत येऊन आपणाशींच हसले ...

... पहांट फुटली. गारठ्यानं काकडलेले मास्तर पाटावर बसले. त्यांच्यापुढं तबक होतं. त्यांत अक्षता होत्या. पेटतं निरांजन होतं. सुपारी होती. मास्तरांच्या उघड्या पाठीला त्यांची आई तेल चोळीत होती. त्याचा सुंगध ...

सावित्री इकडून तिकडे फिरत होती आणि जोडवीं खणखणत होतीं ...

दिवाळीसाठीं आलेली मास्तरांची बहीण रहाटावर पाणी ओढतां ओढतां दमली होती...

मग आंघोळीची गर्दी उडाली. ऊन पाण्यानं मास्तरांची तेल चोपडलेली पाठ पोळली ... पाण्याखालीं ते गुदमरून गेले. म्हणूं लागले ...

" अग ... अग ! अंग भाजलं माझं ! "

मग खांद्यावर धोतरचा सोगा टाकून ते सोप्यांत उभे राहिले. फिकट होत जाणाऱ्या चांदण्याकडे, बाहेरच्या अंगणांत दारू उडविणाऱ्या पोरांकडे बघत.

सोप्याच्या टोकाशीं असलेल्या देवघरांतली समई विझली, म्हणून स्वयंपाक-घराकडच्या दारांतून सावित्री आली. तिनं उजव्या हातांत पणती घेतली होती आणि डावा हात ती विझूं नये म्हणून आडवा लावला होता. त्यामुळं तिचीं नाजुक बोटं तांबडींलाल दिसत होतीं. गोऱ्यापान चेहऱ्यावर, गळ्यांतल्या एकसरावर, छातीवर पिवळट तांबुस उजेड पडला होता. पणती सांभाळून ती एक एक पाऊल काळजीपूर्वक टाकीत होती.

मुलं अंगणांत होतीं. आई, ताई, बाबा, सारे मागीलदारीं होते. पुढं कुणीच नव्हतं.

मास्तर मांजराच्या पावलांनीं गेले. एकदम फुंकर घालून त्यांनीं पणती विझवली. सावित्रीला छातीशीं धरली.

या अनपेक्षित प्रकारामुळं ती घाबरली. किंचाळली. तिच्या हातांतली पणती खालीं पडली.

" अग मी आहें, ओरडायला काय झालं ? " असं हळू आवाजांत सांगून मास्तर पळाले. पार पुढं अंगणांत जाऊन संभावितासारखे उभे राहिले. घरांत केवढी धांवपळ झाली ! मागीलदारीं असलेलीं सगळीं माणसं धांवत आलीं. घाबरून गेलीं. विचारूं लागलीं,

" सावित्री, काय झालं ? काय ग ? "

तिनं खालीं पहात उत्तर दिलं,

" कांहीं नाहीं. वाऱ्यानं पणती विझली. उंबऱ्याला ठेच लागली. समई विझली देवघरांतली म्हणून लावायला आलें होतें. कांहीं नाहीं दुसरं. "

आणि मग सकाळीं फराळ संपवून उठतांना मास्तरांनीं आपल्या पानांत अनारश्याचा एक तुकडा मुद्दाम टाकला !...

* * *

... महारवाड्यांत. ‘ तक्या ’ पुढं कांहीं हौशी मंडळी जमली होती. लावण्या म्हणत होती. त्यांचा तो क्रम नित्याचा होता. अंगणांत उभं राहिल्या राहिल्या मास्तरांच्या कानांवर त्यांचा हा आरडा गोंधळ नेहमीं येत असे. ते तरातरा थेट तक्याकडे गेले, त्यांच्यापुढं जाऊन उभे राहिले.

“ बोधल्या, नामजा, अरे काय म्हणताय, कुणीकडे म्हणताय् , आं ? ” महारं दबकलीं. गोंधळ बंद झाला.

“ ज्वार, मायबाप, उभं का जी, बसा. ”

“ रोज ऐकतोय् तुमचा गोंधळ. थोडं नीट म्हणत चला. कां उगीच आरडा-ओरड करून सगळं गांव डोक्यावर घेताय् ? ”

“ काय येडंआकडं येतं ते म्हनतों झालं. आमा आडाण्यांना काय येतय जी ! ”

“ अरे, पण म्हणायचं तें नीट पद्धतशीर म्हणावं – ”

“ काय तरी करमनुकीखातर म्हनायचं, आमाला कां कुनी सांगतय–असं न्हवं, असं म्हना म्हनून ! ”

“ का तुमावानी कुनी जानतं येऊन शिकवतय् ? लावन्या – छकडी बांदून देतय ? ”

“ येडा का रं नामज्या तूं ? त्येनी तलाठ्याचं काम बगावं का तुमाला लावन्या बांदून द्याव्यात ? ”

“ तसं न्हवं बोधा, काय वाइट हाय त्यांत ? ह्येंचा गळा झ्याक हाय. गानं येतया. शिकवावं आमाला. व्हावं गुरु ! ”

“ म्हणजे तमासगीर होऊं म्हण कीं मी ! ”

“ हो हो ! तुमच्यावानी गुरु मिळाल्यावर आख्या दुनयेंत नांव करूं रेठऱ्याचं. तुसता जंग देऊं उटवून ! ”

“ छया, छया, ह्ये काय तरी तुजं सांगनं, अरं ते बामन मोठ्या घरातलं ; त्येनी हें हलकट काम — ”

“ हलकट नव्हे नामज्या ! ठीक आहे. मी देतों तुम्हांला लावण्या बांधून. चाली सांगतों. फक्कड उठला पाहिजे फड —! ”...

* * *

मुंबईचं ‘ प्ले हाऊस ’ चिकार भरलं होतं. गवगव चालली होती. जरीचा फेटा. मलमली अंगरखा. पायांत सुरवार. पडद्याआडून डफ हातांत घेऊन

मास्तर बाहेर आले. त्यांच्या मागून हंसीसारखीं डौलदार पावलं टाकीत पवळी आली.

शिट्या-टाळ्यांचा एकच गजर झाला. सोंगाड्यानं सटकेबाज शीळ मारून तो बंद करण्याबद्दल इशारा करतांच बंद झाला.

मास्तरानीं पुढं आलेला रुमाल पाठीवर टाकला आणि सोंगाड्याला हांक मारली:

" बाबुराव. "

तो धांदलीनं पुढं आला. आणि कानाला हात लावून म्हणाला,

" हुकुम सरकार. "

" आपल्या नगरीमध्यें एक नवीन पांखरूं आलं आहे. "

बाबुरावनं डोळे मोठे करून फट्कन् विचारलं,

" खरं म्हनतां ? गिधाड हाय का दिवाभीत ? "

त्यासरशीं थिएटर हशानं फसफसलं.

" तसं नव्हे मूर्खा, पांखरूं म्हणजे एक शानदार स्त्री आली आहे. "

" आली असंल ! अशा रोज लाख येत्यात जात्यात. त्यांची शिरगनती तुमाला कां ? "

पुन्हां हशा झाला. तो ओसरल्यावर सोंगाड्याच्या खांद्यावर हात ठेवून मास्तर म्हणाले,

" बाबुराव, तिला जाऊन सांग कीं आम्हीं तुमच्यावर खूष आहोंत. मुखचंद्रापासून पदकमलापर्यंत तुमचं स्वरूप आमच्या हृदयामध्यें ठसलं आहे. "

बाबुराव गेले आणि पवळीपाशीं उभे राहून बोलले,

" अवो "

तिनं ठसक्यांत मान वेळावून विचारलं.

" का वो ? "

" नाहीं, म्हंजे असं हाय् — "

" हां हां, कसं हाय ? "

" तुम्हाला बगून आमचं मालक पार पागळल्यात. "

" खरं ? "

" मग, खोटं सांगाय हें का कोर्ट हाय ? "

" अरे नव्ह मेल्या, मला ठावं हाय हें तमाशाचं थेटर हाय. "

" म्हमईचं ' पिलाहौस ' हाय ! "

" हां हां, पिलहौस हाय. काय म्हनत्यात तुजं मालक ? "

" दुसरं काय ? तुमचं झालं नसलं तर त्येंच्याशीं लगीन करा. असलं तर पयला दाल्ला सोडून गाट मारा ! "

" पन त्येना मी कोन हाय हें ठावं हाय का ? "

" कोन हाय ? "

ढोलक्यावर थाप पडली. तुणतुणं वाजूं लागलं. सोंगाड्या शीळ मारून ओरडला,

" ऐका "

पवळी गाऊं लागली —

" अवो, जातीची मी महारीण हलकी,
कशी सांगाल माझी मालकी,
वाळीत टाकल भाऊबंदकी,
नव्ह नाद चांगला,
बगा विचार आपला ... "

यावर मास्तर पुढं सरसावून बोलले —

" अग असेनास महारीण,
मी तुला ब्राह्मण करीन !
सदाशीवपेठेमधीं, मांडव घालूं थाटामधीं
तिथें करुं लगीन आतां तुझं आमुचें.
नांव तुझें पवळी, आम्ही करूं सवळी.
लोकांच्या डोळ्यांमधीं सारें खुपतें ... "

प्रेक्षकांतून पुनः एकवार सणाणून शीळा उठल्या, आरोळ्या उठल्या —

" शाब्बास रं बहाद्दरा, हाण उचलून ! "

" भली घेतली, याला म्हणावं फंची ! "

" अग, हो बया आतां कबूल ! कुनी कां असंनास तूं, तुझं सोनं करील त्यो ! '

आपण थिएटरांत बसलों आहोंत, हा तमाशा चालला आहे हें बघणारे विसरले.

शेजारीं बिडी पेटवणाऱ्याला धक्का देऊन मुंडासेवाला बोलला —

" कसा हाय बहाद्दर ! बामन हाय, पण कसा हाय धडाका ! "

* * *

... रात्रभर नाचून नाचून दमलेली पवळी अंगाला आळोखे पिळोखे देत होती ... तिच्याकडे पाहून मास्तर म्हणाले,

" पवळे, रामजोशीबाबांना जशी बया मिळाली, तशी तूं मला ... "

यावर ती एक डोळा बारीक करून बोलली,

" जोशीबाबांना बयाचा इटाळ होत होता का ? काय म्हनावं तुमाला ? असं आतां किति दीस चालायचं ? ... "

आणि मास्तरांनीं तिच्या गोंडस हनुवटीला हात लावला ... पहिला स्पर्श ...

मास्तरांच्या मिटल्या डोळ्यांपुढं नाना तुटक दृश्यं येत होतीं, जात होतीं. किती जुन्या आठवणी, किती पूर्वीच्या. या सगळ्यांवरून मास्तरांचं मन धांवत होतं. गिरगिरत होतं.

* * *

... ते पलंगावर बसले होते, समोर खालीं मान घालून पवळी उभी होती. मास्तर आवेगानं बोलत होते,

" अखेर तूं बेइमानी दाखवलीस ! माझं काळीज कापलंस ! तुझ्यासाठीं मी काय सोडायचं ठेवलं आहे ? घर सोडलं. नात्यागोत्याचीं माणसं सोडलीं. लग्नाची बायको सोडली. जात सोडली. आकाश कोसळलं तरी डगमगलों नाहीं. तुझ्याबरोबर फडांत उभा रहातों म्हणून फडांतली मराठे मंडळी फड सोडून गेली ... मी महार जमवले आणि फड चालू ठेवला. त्यांनींहि तुझ्यापायीं मला सोडलं. कुठं ढोलक्या मिळेना. सुरप्या मिळेना. एक माणूस फडांत येईना. तरीहि मी लटपटलों नाहीं. मुंबईच्या थिएटरांत, चार सहा जोगतिणी, कलावंतिणी बरोबर घेऊन आठ दिवस तमाशा केला. गल्ल्यांत एक पैशाची तूट पडूं दिली नाहीं. सगळे नाक घाशीत परत फडांत आले ! ही बहादुरी तुझ्या जोरावर, तुझ्या जिवावर. पैशांच्या राशीवर तुला बसवली. सोन्याच्या ढिगांत झांकली...आणि तूं बेईमान झालीस ? मला सोडून तुला एका फडतूस...जाऊं दे. मी तुझ्यावर जोरा करीत नाहीं. तें बरोबर नाहीं. खुषीनं राहिलीस तोंपर्यंत माझी होतीस. आतां तुझी मर्जी उडाली. ठीक आहे. तूं जा. माझ्यापासून जा. कुठंहि, कुणाकडेहि जा. तुझी वाट तुला मोकळी आहे ... "

आणि ती गेली. एवढीं वर्षं ळळा लावून अशी अचानक गेली. सारा पट उधळला गेला. फड मोडला. सौंगडी निघून गेले. काळ गेला आणि मास्तरांना नुसतं पहाण्यासाठीं, त्यांचं गाणं ऐकण्यासाठीं जीव आटवणारे प्रेक्षकहि त्यांना विसरले... भरल्या संसारांतून उठलेले मास्तर आख्या जीवनांतूनहि उठले ! पार नाहींसे झाले !...

* * *

तेल आणायला गेलेली ताई परत आली. दारांत आल्यावर कुणाला कीं म्हणाली,

" थांबा, मी दिवा लावून आनतें."

तिच्याबरोबर दुसरं कुणी तरी असावं. मास्तरांना वाटलं, आपल्याला कुणीतरी म्हणतय् —

" तुमाकडं आल्यात, उठून बसा. मी आलें दिवा लावून."

भावनावश झालेले मास्तर उठून बसले. दाराबाहेर, काळोखांत उभ्या असलेल्या त्या माणसाकडे बघूं लागले. अशा वेळीं कोण आलं ?

ताई दिवा लावून घेऊन आली. त्या माणसाला म्हणाली,

" या आंत."

" वाकून या. वर लागेल डोक्याला –" मास्तरांनीं सूचना दिली.

त्यावर तो गृहस्थ हसला. दोन्ही हात जोडून त्यानं मास्तरांना नमस्कार केला. तो स्वीकारून अगत्यानं मास्तर म्हणाले,

" या, या, बसा. असे वर बसा !"

मध्यम वयाचा होता तो. पोशाखावरून ब्राह्मण दिसत होता. त्याच्या काखोटीला कागदांचं कसलंसं बाड होतं. मास्तरांच्या पुढं तो आदबीनं बसला. आपण होऊन बोलूं लागला,

" मी नाना साठे. इथं म्युनिसिपालिटींत नोकर आहें. आपला प्रत्यक्ष परिचय नाहीं. पण मी एक नादी आहें तमाशाचा, लावण्यांचा. आपणाला फडांत पाहिलं आहे अनेकवार. प्रत्यक्ष बोलाचालीचा योग नाहीं आला कधीं. आज भाग्य उजळलं. आनंद झाला आपल्या भेटीनं —"

ताई मधेंच म्हणाली,

" दुकानांत बसलं होतं त्या वाण्याच्या. कागद बघटलं आन इच्यारलं, ' बाई, तुमी कोन ? हे कागद आनले कुटनं ? ' मग मीं तुमचं नांव घेतलं. वाण्याशीं काय बोलाचाली झाली. तेल दिलं. ते कागद घेतलं. मला म्हनालं, ' चला मी येतो तुमासंग. "

" होय. " साठे म्हणाले, " रद्दी म्हणून लावण्यांचीं हस्तलिखितं आलीं, त्यांत नांव आपलं गुंफलेलं. सहज नजर गेली म्हणून चौकशी केली, तर तुम्हीं स्वतःच ह्यांना कागद देऊन पाठवल्याचं कळलं. वाईट वाटलं. आंतडं पिळवटून आलं. आख्या शहरपुण्यांत दिवाळी चालली आहे ; घराघरांत दिवाळी चालली आहे आणि आपण ... "

" हं " सुस्कारा सोडून मास्तर म्हणाले, " कालगति गहन आहे ! चालायचं. कधीं असं कधीं तसं. आलांत ; बरं झालं ! साठे म्हणजे ब्राह्मण आपण ? होय ; माझ्याकडे आलांत. या महाराच्या खोपटांत ! तुमचं स्वागत करायला शब्दावांचून माझ्यापाशीं दुसरं कांहीं नाहीं. हें खोपटसुद्धां माझं नाहीं. हिचं आहे. या ताईचं. महारीण आहे ती जातीनं. जोगतीण. अडाणी आहे, पण चांगली आहे. स्पष्टच सांगतों; तमासगिराला कशाला आडपडदा ? ही मागं जवानींत होती, तेव्हां तमाशाला यायची माझ्या. फिदा झाली बघून. खूष झाली. जीव ओंवाळून टाकूं लागली माझ्यावरून. तेव्हां तिचंही चांगलं होतं. पैसा होता जवळ. आतां उधळला तिनं आणि मी, दोघांनींहि. मीं घरदार सोडलं. महारापोरांत मिसळलों. तमाशाच्या फडांत उभा राहूं लागलों. गांवोगांव फिरलों. चाळीस वर्षं मुशाफिरी केली. हजारोनं पैसा मिळवला, उधळलाही. अभक्ष्यभक्षण, अपेयपान, नाना तऱ्हा. एखाद्या राजासारखा राहिलों ! आणि अलिकडे सद्दी संपली ! आपल्या गांवीं गेलों तर कुणी विचारीना. कोणी जवळ करीना. रोज एकादश्या होऊं लागल्या. अति हाल झाले. मग ह्या ताईनं हात दिला. म्हातारपणीं तरुणपणची ओळख ठेवून घरीं घेऊन आली इथं. तिचंही गेलंय् आतां सगळं. भिकारीण झालीय् ती. ठीक आहे. आतां कुणी तमासगीर, ' मास्तर मास्तर ' म्हणून येत नाहीं. बसत नाहीं. बसतों एकटाच आपला इथं ... "

साठे ऐकत होते. ताई ऐकत होती.

मास्तरांना आपण जास्त बोललों असं वाटलं कीं काय कोण जाणे. ते म्हणाले, " उगीच ऐकवतों आहें हें भारुड आपणाला...द्या सोडून." आणि गप्प झाले.

साठे विरघळले होते. हलक्या आवाजांत बोलले,

" चमत्कारिक आहे झालं सगळं. आपली योग्यता थोर. केवढं सामर्थ्य आपलं आणि काय हें ! "

मास्तरांनीं घसा साफ केला. उजव्या हाताची चिमट पुढं करून ते म्हणूं लागले —

" श्रेष्ठवर्ण मी ब्राह्मण असुनी,
सोवळें ठेविलें घालुन घडी.
हातीं धरली मशाल तमाशाची
लाज लावली देशोधडी ऽ ऽ
चैन भोगली घडोघडी
पण संसार झाला पडापडी
लग्न लावलें, कुटुंब केलें
कळत असुनी टाकली उडी...!

" जाऊं द्या ! विसरा तें. असंच आहे हें. आमच्यासारख्यांना हे असेच दिवस शेवटीं ... ! "

मास्तर भिंतीशीं अधिक घसरून बसले. ताईनं जांभई दिली.

नानानीं इकडे तिकडे पाहिलं. रद्दी म्हणून वाण्याघरीं चाललेलं तें बाड मास्तरांच्या पुढं करीत ते म्हणाले,

" घ्या, हें ठेवा. मी इथंच राहतों, चार गल्ल्या सोडून. कुणालाही विचारा नाना साठे म्हणून; घर सांपडेल. कांहीं अडचण असली तर कळवीत जा. संकोच नको. आपला बंधू समजा मला. "

मास्तर द्रवले. पार पाणी झाले. म्हणाले,

" उपकार आहेत. तुमच्यासारखीं माणसं आढळलीं म्हणजे वाटतं ... विडी आहे का तुमच्यापाशीं ? द्या एक असली तर — "

नानांनीं कोटाच्या खिशांतून पुडा काढून समोर ठेवला. त्यांतली एक पेटवून मास्तर ओढूं लागले.

ती अर्धी अधिक ओढून होईपर्यंत तिघंहि गप्पच होतीं.

शेवटीं मास्तरांनीं विडी विझवली आणि ते म्हणाले,

" आतां आवाज चालत नाहीं. पण आपण रसिक घरीं चालून आलांत. नसे जाऊं नका. थोडी सेवा घ्या ... ! " उठले आणि खुंटीचं ढोलकं काढलं. तुणतुणं काढलं. आपण ढोलक्यावर बसले. ताईला म्हणाले,

" ताई, नुसता सूर धर "...... आणि ढोलक्यावर चाळीस वर्षांचीं तीं सराईत बोटं वळवळूं लागलीं. घसा साफ करून मास्तर म्हणूं लागले ...

" अग रूपसुंदरी राजस बाळी
नको पुढं जाउं भराभरा
उभी राहुन ग बोल जरा — "

तुणतुण्याची तुई तुई, ढोलक्याचा कडकडाट आणि मास्तरांचा आवाज. त्या ओळखीच्या ओळी. साठे भिंतीशीं रेलले आणि त्यांनीं डोळे मिटले —

* * *

... गर्दीतून धक्के खात आणि देत ते कसेबसे कनातीपर्यंत पोचले. तिकिट विकणाऱ्याभोंवतींही गर्दीचा तोबा उडाला होता. त्यांतूनहि घुसून साठे पुढं गेले आणि खिशांत हात कोंबत म्हणाले,

" एक तिकिट द्या बघूं. "

मिशा काढलेला आणि कपाळावर गंधाची टिकली लावलेला तो पोरगेलासा तिकिटमास्तर कुऱ्यांत बोलला,

" तिकिटं उडालीं संमदीं. दीड रुपयाचं शिल्लक हाय. "

" मग तें द्या. " पैसे काढून त्याच्या हातावर ठेवीत साठे म्हणाले.

बाजूचा एक फेटेवाला त्यांच्याकडे पाहूं लागला. त्याला बोलले,

" अहो, नाद म्हटल्यावर करायचा. दहा रुपये तिकिटाखातर गेले तरी बेहत्तर ! "

आणि गडबडीनं कनातींत गेले. अपरंपार माणूस भरलं होतं. कुठं पाय ठेवायलासुद्धां जागा नव्हती. हाताची छातीवर घडी घालून साठे कनातीशीं उभेच राहिले आणि समोर बोर्डावर बघूं लागले.

पहिला गण संपला होता. माणसांचीं डोकीं सारखीं वर होत होतीं. जो तो चवड्यावर बसून पुढच्या डोक्यावरून पुढं पाहात होता. साठेसुद्धां अधीर झाले होते. बोर्डावरून दृष्टि हलवीत नव्हते.

अखेर मास्तर बाहेर आले, त्यांच्या मागोमाग पवळी आली. दोघांनींहि प्रेक्षकांना मुजरे केले.

शिट्या-टाळयांचा कल्लोळ झाला. हवेंत फेटे उडाले !

भरजरीचा फेटा बांधलेले मास्तर, सोन्याचीं सलकडीं घातलेल्या हाताची थाप डफावर टाकून गौळण म्हणूं लागले.

गोरीपान देखणी पवळी टोपपदरी लुगड्याचा पदर सावरून, चाळ घातलेले पाय ठसकावूं लागली. तुणतुणं चढलं. ढोलकं कडकडूं लागलं. सुरप्यांचे आवाज पार गगनाला भिडले. प्रेक्षक देहभान विसरले. रसगंगेंत डुंबूं लागले.

गौळण संपली. झगडा सुरू झाला.

नखऱ्यांत उभी राहिलेल्या पवळीकडे हात करून मास्तर गाऊं लागले—

"अग रूपसुंदरी राजस बाळी,
नको पुढं जाउं भराभरा
उभी राहुन ग बोल जरा,
काया कवळी नाजुक पिवळी,
लिंबु रसरशित आलं भरा
ठाकठिक रेखली
कुठं नाहीं चुकली
धन्य देव तुला घडवणारा ...
हे जी जी रं जी
हे जी ..."

मग पुन्हां एकवार प्रेक्षक उसळले. चवल्यापावल्यांची बेसुमार उधळमाधळ झाली. सारं बोर्ड नाण्यांनीं भरलं. तीं वेंचतां वेंचतां पवळी थकून गेली. कुणी डोक्यावरचे भरजरीचे फेटे फेकले. कुणी बोटांतल्या अंगठ्या दिल्या. कुणी इर्षेनं कमरेचे शे-पांचश्यांचे कसे तसेच बोर्डावर फेकले ! लोक वेडावले होते. गाणं पिऊन झिंगले होते ! ...

—भानावर येऊन साठ्यांनीं डोळे उघडले, तेव्हां मास्तरांची लावणी संपली होती. म्हातारा थंड बसला होता. तृप्त झाला होता.

डोळे मिटून आणि मान डोलवून आवेगानं साठे म्हणाले,

" वहावा, वहावा ... "

मास्तरांनीं पुन्हां एक विडी पेटवली.

साळ्यांनीं खिशांतून एक पांचाची नोट काढली. ती त्या लावण्यांच्या बाडावर ठेवली आणि तें बाड उचलून पुढं करीत बोलले,

" हें ठेवा. याचा स्वीकार करा. मीं काय द्यावं आपणाला ... पण असूं द्या. माझ्या मनाच्या समाधानासाठीं. तुम्हाला कष्ट दिले. रात्र झाली. झोपा आतां — आणि हें पहा, अडीअडचणीला कळवत चला ... मला आपला माना ... "

मास्तरांनीं लावण्यांचें बाड परत केलं —

" हें नका परत करूं, न्या तुम्हाकडे. माझी आठवण म्हणून संभाळा हें धन. माझ्यापाशीं नाहीं रहाणार. जाईल वाण्याघरीं तेलामिठापायीं ...

" आणि हें बघा, एक मागणं आहे आपणापाशीं. क्षुद्र आहे. आपण हसाल ... मला ब्राह्मणी पद्धतीनं केलेलं जेवण जेवायचं आहे ... कित्येक वर्षं झालीं ... ! तुमच्या कुटुंबाला सांगा कीं एका महाराला गोडधड खाण्याची इच्छा झाली आहे म्हणून ... सांगाल ? कराल एवढं ? "

नाना म्हणाले, " होय करीन. " आणि धोतरानं डोळे पुशीत बाहेर पडले !



# काकींच्या पाटल्या

पहिला कोंबडा आरवला तशा काकी जाग्या झाल्या. उशालगतचा तांब्या घेऊन त्यांनीं चूळ भरली. डोळ्यांना पाणी लावलं. दळणाचं टोपलं औशीं झोंपतांनाच जात्यापाशीं ठेवलं होतं. अंधारांत तें अचूक त्यांच्या हातीं आलं. जात्याची घरघर चालू झाली.

भिंतीलगत झोपलेल्या म्हाताऱ्या आत्याबाई त्या घरघरीनं अर्धवट जाग्या झाल्या, आणि कूस बदलून पुन्हां घोरूं लागल्या.

पलीकडच्या खोलींत कानटोपी घालून आणि धाबळी पांघरून अंथरुणावर पडलेले तात्याबा जागेच होते. म्हातारपणामुळं आतां त्यांना रात्रभर झोंप येत नसे. सुरुवातीला एखादी डुलकी झाली कीं मग ते जागेच असत. उठून अंथरुणावर बसून त्यानीं तंबाखूची चिमट तोंडांत धरली.

आणि मग काकींच्या जात्याच्या घरघरीनं विधवा बनूवहिनी आणि त्यांची खिडमी पोरगी शकू, कोंपऱ्यांतला बंड्या कुत्रा आणि कणगीपाशीं अंगाचं मुटकुळं करून पडलेले आप्पा, काकींची लग्नाला आलेली पोर विठा आणि तिचा गालफडं बसलेला मोठा भाऊ दामू या सर्वांच्या झोंपा चाळवल्या.

दहा-पंधरा घास मुक्यानंच टाकल्यावर काकी बारीक आवाजांत म्हणूं लागल्या,

गौळण दसवंती पै सांगे
आलिया कृष्णाचेनि मागे
येणे येणे वो श्रीरंगे
नवनीत भक्षिलें माझें ...

काकींचा आवाज मंजुळ होता. म्हणण्याची धाटणी गोड होती. जात्याची घरघर आणि नामदेवाच्या भूपाळीचे गोड स्वर! त्या उदास, कोंदट घरांत एकाएकीं प्रसन्नता भरून राहिली. जात्याच्या पाळींतून पांढरं शुभ्र पीठ गळत होतं. आणि काकींच्या गळ्यांतून – भूपाळी. एक कडवं संपतांच त्यांना दम लागे आणि नुसतंच जातं घरघरे –

घुऽऽर्र घुऽऽर्र घुर्र

ज्या आवाजानं जाग आली त्याच आवाजानं पुन्हा सगळीं झोपीं गेलीं. फक्त विठा मात्र झोपली नाहीं. ती उठून आईपाशीं आली आणि जड जातं ओढण्यांत तिला मदत करूं लागली.

मग भरभर घास पडूं लागले. भरभर पीठ गळूं लागलें. सावकाशीनं येणारा जात्याचा आवाज जलद झाला. भरून आलेल्या हातांची अदलाबदल होऊं लागली. काकींच्या आवाजांत विठाचा कोमल आवाज मिसळला. त्या उदास, कोंदट आणि अंधेऱ्या घरांतली प्रसन्नता अधिक वाढली.

येणे माझें कवाड गे उघडिलें
येणे माझें शिंकें गे तोडिलें
दह्यादुधाचें भक्षिलें
उलंडिलें ताकाचें ...
घुर्रऽऽऽ घुर्रऽऽऽ घुर्रऽऽऽ

मग स्वयंपाकघरांत झोपलेल्या ठेंगण्या बनूवहिनी जाग्या झाल्या. समई पेटवून त्यांनीं पोरांच्या अंगावर पांघरूण घातलं. गडबडीनं चुलीला पेटत घालून त्या भाकरी बडवायला बसल्या. कारण सकाळीं लवकर उठून दामूभावजी तालुक्याला जाणार होते. त्यांना भाकरी बांधून द्यायला हव्या होत्या. चिपाडाचा करपट वास आणि पिवळा-तांबडा उजेड यांनीं स्वयंपाकघर भरलं. बनू-वहिनींचा भाबडा चेहरा, लख्ख घासलेल्या भांड्यासारखा उजळून निघाला. धुरानं त्यांचे डोळे ओले झाले.

सर्वांचीं कामं कशीं यंत्रागत चाललीं होतीं. कुणी कुणाशीं बोललं नाहीं. विठा काकीशीं बोलली नाहीं. काकी विठाशीं बोलली नाहीं. आणि बनूवहिनी काकी-विठाशीं बोलल्या नाहींत.

मग आप्पा जागे झाले. करदर्शन घेऊन उठले. बाहेर बांधलेल्या बैलांना त्यांनीं वैरण घातली.

दामू धडपडून उठला तेव्हां काकींची ओवी संपली होती. दळण आटपून त्या पीठ भरीत होत्या. बाहेर चांगलं फटफटीत झालं होतं. आंतला अंधार गेला होता. पीठ भरणाऱ्या काकीकडे बघून दामू घाईनं बोलला,

"अग काकी, भाकरी केल्या का ? लवकर जागार आहें मी!"

त्याचा हा आवाज आंत वहिनींच्या कानांवर जातांच त्या नाकांतून बोलल्या,

"झाल्यात हो भावजी. बांधूं का ?"

अंथरुणावर बसलेल्या तात्याबांना सून फार मोठ्यानं ओरडली असं वाटलं. त्यांची सुरकुतली मुद्रा त्रासिक झाली. दांत नसलेलं तोंड हलवीत हलवीत ते उठले आणि उंबऱ्यांत येऊन म्हणाले,

"किती ओरडावं ग! हळू बोललं तर नाहीं का भागत ?"

दरम्यान् आत्याबाई जाग्या होऊन अंथरुणाच्या वळकटीला टेकून बसल्या होत्या. त्यांनीं तपकिरीची चिमूट नाकाला लावीत भावाच्या बोलण्याला दुजोरा दिला,

"द्वाड! हलक्या आवाजांत बोलायचं ठाऊकच नाहीं कधीं! फिदीफिदी हसणं काय, वसावसा बोलणं काय! बायकाच्या जातीला शोभतं का असलं ?"

आत्याबाईचा आवाज कावळ्यासारखा होता. आपलं बोलणं संपतांच नाकाला सुरकुत्या पाडून त्यानीं तिरप्या डोळ्यानं विठाकडे पाहिलं.

या बोलण्याचा रोख आपणावर आहे हें विठानं ओळखलं होतं. काकींनींहि ओळखलं होतं. विठा आतां लग्नाला आली होती आणि पोटीं पोरबाळ नसलेल्या आत्याबाई-तात्याबांना या गोष्टीचा विलक्षण विषाद वाटत होता. मत्सरानं त्यांचीं म्हातारीं मनं चिकचिकलीं होतीं!

या सगळ्या बोलण्यानं दामूचा काळा आणि गालफडं बसलेला मुखवटा त्रासिक झाला तो पुटपुटला,

"हं, झाली सकाळच्या प्रहरीं सुरवात!"

आंत येणाऱ्या तिखट कानाच्या आप्पानीं हें ऐकलंच. ते आपल्या बहिणीवर खेकसले,

" तुला काय करायंचय् ? हसेनात ! बोलेनात ! आपण गप्प बसावं ! "

आणि मग चिडचिड्या आणि त्रासिक मुद्रेनं सगळींच आपापल्या उद्योगाला लागलीं !

या सगळ्या घरांत कसलाच मेळ नव्हता. कुणाचा पायपोस कुणाच्या पायांत नव्हता. सर्वांत वडील तात्याबा होते. उमेदींत तलाठ्याचं काम करून त्यानीं आतां पेन्शन घेतली होती. हा म्हातारा मोठा कावेबाज आणि धूर्त होता. त्याची बायको कधींच मेली होती. एकुलता एक, कर्ता पोरगाहि नुकताच घटसर्पानं आटपला होता ! भाबडी सून बनू आणि खिडमी नात शकूच मागं होतीं. त्यामुळं तात्याबांना कशांतच स्वारस्य उरलें नव्हतें.

तात्यापेक्षां धाकटा आप्पा. त्याचीहि तीच गत होती. बायको बाळंतपणांत मेली होती. थोरली पोरगी नाशिकला आपल्या नवऱ्यापाशीं होती. धाकटा मुलगा बहिणीपाशीं राहून इंग्रजी शिकत होता. आप्पा घरीं राहून शेतामळ्यांत राबत होते. थोरल्या तात्याबाबद्दल त्यांच्या मनांत दुःख होता.

आत्या आप्पापेक्षां धाकटी बहीण. तिच्या पोटीं मूलबाळ नव्हतं. फार लहान-पणीं तिचा नवराहि उलथला होता. ही म्हातारी थेट थोरल्या तात्याबांच्या वळणावर गेली होती. आपला एक फेंगडा पाय उडवीत ती गांवभर फौजदारी करीत हिंडे.

काकींचा नवरा, दामू-विठाचा बाप, हा आत्याबाईपेक्षां धाकटा. हा माणूसहि मोठा वस्ताद आणि बेरकी होता. अविश्वासू आणि दगेबाज होता. मुंबईला कुण्या दुकानांत तो कामाला होता आणि अफरातफर केल्याबद्दल बेसुमार मार खाऊन त्यांतच आटपला होता !

बनूवहिनीनीं बांधून दिलेल्या भाकरी पाठीशीं टाकून दामू बाहेर पडला आणि तंगड्या तोडीत तालुक्याच्या वाटेनं चालूं लागला.

फटफटीत झालं, सगळं खेडं हलूं बोलूं लागलं. पीठ भरून काकी उठल्या पुन्हा दुसऱ्या कामाच्या उसाभरीला लागल्या. अंगणांत सडा शिंपूं लागल्या.

जाड्याभरड्या लुगड्यांत झांकलेली त्यांची काटक काया कामाकामानं खंगली होती. काळजीनं वाळली होती. नवरा मेल्यापासून त्या कष्ट उपशीत होत्या. नुसते कष्ट ! पोटाला चिमटा घेऊन आप्पा-तात्याबांचीं खवचट बोलणीं सोसून

गेलीं वीस वर्षं कष्ट करीत होत्या. घरांतले कष्ट, रानांतले कष्ट. दोन दोन पायलीचीं दळणं दळावीं. दोन दोन मण खपल्या कांडाव्यीत. हरभरे भरडावेत. वर्षाच्या डाळी कराव्यात. रानोमाळ हिंडावें. पावसाळ्यापुरतें जळण गोळा करावें. गोवऱ्या थापाव्या. भिंती सारवाव्या. सारखं कष्ट करीत राहावं. एखाद्या यंत्रा-सारखं! आणि अलिकडे त्यांना विठाच्या लग्नाची काळजी लागली होती. पोरीचं लग्नाचं वय झालं होतं तरी घरचीं कुणी माणसं कांहीं बघत नव्हतीं.

तात्याबा निर्विकार होते. आत्याबाईंना गांवच्या फौजदारींतून सवड होत नव्हती. आप्पा रानामाळांत दिवसभर गुंतून होते आणि दामू त्यांच्या हाताखालीं राबत होता. आप्पांचा कृष्णा नाशिकला राहून इंग्रजी शिकतोय आणि आपण इथं अडाणी राहून नांगरमोट करीत राहिलोंय, म्हणून तो कष्टी होता. घरांत कुणाशींच तो चार शब्द नीट बोलत नव्हता. काकींशीं सुद्धां! आणि म्हणूनच काकींना विठाच्या लग्नाची फार काळजी लागली होती. पोरगी रूपानं चांगली ठसठशीत होती. खेडेगांवांत राहूनसुद्धां चांगली हुषार होती. घरकामांत तरबेज होती. तिला एकदां चांगलं घर बघून उजवून टाकली म्हणजे काकींच्या उरावरचा मोठा धोंडा उतरणार होता.

सडा शिंपतां शिंपतां काकींच्या मनांत हेच विचार चालले होते. अलिकडेच दामूमागं सारखी भुणभुण लावून त्यांनीं त्याला गांवोगांव फिरवला होता. आपल्या एका नातेवाइकाला गळ घातली होती कीं, पोरीला स्थळ बघा. त्या भल्या माणसानं दामूच्या बरोबरीनं जोडे झिजवून एक बरा मुलगा शोधून काढला होता. मुलगी दाखवली होती. लग्नाचा सर्व खर्च सोसून तो विठाशीं लग्न करायला तयार झाला होता. कार्य मुंबईला घडणार होतं. भाडं आणि कांहीं किरकोळ खर्च यासाठीं थोडेफार पैसे गांठीला हवे होते. पण ते आणायचे कुठनं?

हातांत रांगोळीची वाटी घेऊन विठा बाहेर आली आणि उंबऱ्यावर पद्मं काढूं लागली. आजूबाजूला कुणी नाहींसं पाहून हलक्या आवाजांत तिनं काकींना विचारलं,

"दामू तालुक्याला कशाला गेलाय ग?"

तशा काकी खेकसल्या,

"अग मला काय ठाऊक? तो माझ्याशीं नीट बोलतो का? सांगतो का कधीं कांहीं मला?"

विठा खट्टू झाली आणि खालीं मान घालून रांगोळीच्या रेघा ओढूं लागली.

त्या बिचारीला या घरांतून केव्हां एकदां आपली सुटका होतीय् असं झालं होतं. तात्याबांचा छळवाद तिला नको झाला होता. ती कुठंहि गेली कीं तात्याबा तिच्या पाळतीवर असत. कुठं गेली होतीस ? काय काम होतं ? त्या अमक्याशीं कशाला बोलत होतीस ? या प्रश्नांचीं उत्तरें तिला दिवसांतून दहापांच वेळां द्यावीं लागत. ओढ्यावर गेलं तरी बेरक्या आत्याबाई पाय उडवीत तिच्या मागोमाग जात. घरांत कधीं तिची ल्या-नेसायची हौस पुरली नाहीं. कधीं मोकळे-पणानं हसा-बोलायला मिळालं नाहीं. सदान् कदा कर स्वयंपाक, घास भांडीं, धू धुणीं ! पोरगी कंटाळली होती. या तुरुंगांतून आपण केव्हां सुटूं असं तिला झालं होतं. बरोबरीच्या पोरींचीं भराभर लग्नं होत होतीं. त्या सासरीं नांदायला जात होत्या. आणि विठा अद्याप घरींच होती. तिच्या लग्नाची कुणी खटपट करीत नव्हतं. कुणीच करीत नव्हतं. विठा निराश झाली होती. कडवटपणानं स्वतःशीं म्हणत होती,

'यापरीस गळ्यांत धोंडा बांधून विहिरींत उडी घ्यावी.'

दाखवायला नेली तेव्हां तिनं आपला भावी पति पाहिला होता. तो चांगला गोरागोमटा होता. इंग्रजी शिकलेला होता. शेंसव्वाशें रुपयांची त्याला नोकरी होती. विठाची उत्सुकता विलक्षण वाढली होती. आणि घरांत कुणीच बोलत नव्हतं ! काकीपाशीं पैसे नव्हते. दामूपाशीं पैसे नव्हते. तात्याबा आपल्या पेन्शनीच्या पैशावर नागोबासारखे बसून होते आणि अप्पा कानांवर हात ठेवून मोकळे झाले होते. भाडेखर्चासाठीं पैसे नाहींत म्हणून आपलं लग्न मोडणार कीं काय ? पोरगी भीतीनं मलूल झाली होती.

सडा घालून काकी आंत गेल्या तेव्हां तात्याबा चहाचं भांडं पुढं घेऊन दोन पायांवर बसले होते. त्यांच्या डोक्याला पांढरा रुमाल होता. अंगावर उपरणं होतं. दोन्ही हात जोडून ते चहा निवण्याची वाट पाहात होते. तात्याबा सोडून घरांत इतरांना चहा मिळत नसे. आत्याबाई आणि बनूवहिनी चोरून पीत असत.

मग म्हाताऱ्यानं धूर्तपणानं काकींना विचारलं,

"कशाला गेलाय तो तालुक्याला, शेतीवाडीचीं कामं सोडून ? आँ ! कशाला गेलाय् ?"

" कुणाला ठाऊक ! मला कधीं सांगून जातो का तो ? "

काकींच्या या उत्तरासरशीं चुलीपुढं खुट्टु खुट्टु करणाऱ्या बनूवहिनी विलक्षण घाबरल्या. आपल्या सासऱ्याला जणूं आपणच एकादं उर्मट उत्तर दिलं, अशी त्यांची चर्या झाली आणि त्यांच्या हाताचा धक्का लागून एका भांड्याचा ठाणकन् आवाज झाला.

" फोडा, फोडा भांडीं ! " तात्याबा गरजले. " भांचोत, सगळींच माणसं धांदरट कशीं या घरांतलीं ! मला कांहीं कळतच नाहीं. कुणालाच समज नाहीं, कुणीच जाणतं नाहीं. मला कांहीं कळतच नाहीं ! "

आणि मग बराच वेळ त्यांची टकळी चालू राहिली. शेवटीं जेव्हां चहा निवून जातो आहे हें त्यांच्या ध्यानांत आलं, तेव्हां त्यानीं भांडं उचललं आणि मिटक्या मारीत ते चहा पिऊं लागले.

पुढचा सोपा, खोली, उभंकडी सारवून घ्यायच्या कामाला काकी लागल्या. कारण आतां विठाचं लग्न होतं. पोरीच्या लग्नाच्या तयारीला काकी केव्हांच लागल्या होत्या. त्यांतल्यात्यांत हात राखून त्यानीं पापड केले होते. कुरवड्या केल्या होत्या, सांडगे घातले होते. दूरदर्शी काकी केव्हांच कामाला लागल्या होत्या. न बोलतां, गाजावाजा न करतां त्या विठाच्या लग्नाची तयारी करीत होत्या.

चपळ हातानं शेणकाला ओरबाडतां ओरबाडतां त्या मनाशीं म्हणत होत्या,

" किती चौकश्या ! किती चौकश्या ! गेलाय् कामासाठीं. काय करायचंच तुम्हांला ? तुम्ही कुणी बघत नाहीं. पोरीच्या लग्नासाठीं दोन-तीनशें रुपये लागायचे तर पुढं होऊन कुणी द्यायला तयार नाहीं. तिच्या बापाचं जणुं कांहींच नाहीं घरांत ! मस्त ठेवलंय त्यानं ! शेतं मळे आहेत त्यांत कांहीं हिस्सा नाहीं ? एक सालच्या मिरच्या विकल्या तर पोरीच्या लग्नापुरते पैसे येतील ! पण मनांत आहे कुणाच्या ? कुणाच्या आहे ? "

दामू कशासाठीं गेलाय हें काकींना ठाऊक होतं. त्यांनींच तर त्याला पाठवला होता. कुणी बघितलं नाहीं तरी त्यांचं त्यानीं बघायला पाहिजे होतं. तीनशें रुपयांसाठीं काय लग्न मोडायचं ? मुंबईला असतांना विठाच्या बापापाशीं हट्ट धरून धरून काकीनीं चांगल्या सहा तोळ्यांच्या पाटल्या करून घेतल्या

होत्या. काकींच्या भुणभुणीला कंटाळून एके दिवशीं तयार पाटल्या आणून त्यानं काकींपुढं टाकल्या होत्या. गरिबीच्या संसारांत सहा तोळ्यांच्या पाटल्या करायच्या म्हणजे कांहीं सोंग नव्हतं! नवरा मेल्यापासून हें धन काकीनीं जपलं होतं. तात्याबा आणि आत्याबाईनीं जंग जंग पछाडले तरी त्यानीं दाद लागूं दिली नव्हती. मधीं किती अडीअडचणी आल्या; पोरीला नेसायला धड धडुतीसुद्धां मिळेनाशीं झालीं; दामूची मुंज झाली ती किती गरिबीनं! किती साधेपणांत! पण काकींनीं पाटल्या मोडल्या नाहींत. पण आतां वेळ आली होती. चिंध्याचांध्यांत गाडग्यामडक्यांत लपवलेल्या पाटल्या काढून त्यांनीं गुपचुप दामूच्या हवालीं केल्या होत्या. पाणीभरल्या डोळ्यांनीं सांगितलं होतं,

"ह्या घे. तुझ्या बापाची कमाई आहे. बँकेंत गहाण ठेव आणि पैसे आण. पोरगी एकदां आपल्या नवऱ्याच्या घरीं गेली म्हणजे माझा जीव खालीं पडेल!"

आणि दामू गेला होता.

काकींना माहीत होतं. त्यांनींच तर त्याला धाडला होता.

दुपारचे बारा वाजले. धुण्याचा गठ्ठा गोळा करून विठा विहिरीवर गेली.

तात्याबा पान कुटीत बसले होते त्यांच्या ध्यानीं ही गोष्ट आली. आपणहि विहिरीवर चक्कर मारली पाहिजे असं त्यांना वाटलं आणि मग अगदीं घाईघाईनं ते पान कुटूं लागले.

तेवढ्यांत आत्याबाई पाय उडवीत आल्या आणि नाकाला सुरकुत्या पाडून बोलल्या,

"काय कार्टं तरी निघालंय, बापाच्या वर!"

तात्याबांनीं चेहरा त्रासिक केला आणि विचारलं, "कोण कार्टं, आँ?"

"दाम्या आपला!"

"दाम्या? आणि त्यानं काय केलं?"

"त्या रंगा वाण्याकडनं माझं नांव सांगून केव्हां पांच रुपये आणलेत उसने! आज तो मला मागत होता. काय द्वाड अवलक्षण!"

वास्तविक रंगा वाण्याचे पैसे आत्याबाईनींच घेतले होते. फक्त ते दामूच्या हातून त्यानीं आणवले होते. त्याला दोन वर्षं झालीं होतीं. साहजिकच त्यानं ते आत्याबाईशीं मागितले तेव्हां त्या विलक्षण संतापल्या आणि हा सारा प्रकार त्यानीं दामूच्या अंगावर ढकलला!

मळ्यांत गेलेले आप्पा आरडाओरडा करीत आले. लिंबाच्या झाडावर मोजून ठेवलेल्या लिंबांपैकीं एक कुणीं लांबवलं होतं. हातवारे करून ही बातमी त्यांनीं घरांत जाहीर केली.

आत्याबाई म्हणाल्या,

" हें काम रंगा वाण्याचं. त्याचं पोरगं भुतानं पछाडलंय त्यासाठीं तो माझ्या कडे लिंबू मागत होता. "

आणि मग तीं दोघं बहिणभाऊ तावातावानं बाहेर पडलीं. रंगा वाण्याची धिंड काढण्यासाठीं. भांडून भांडून त्याचं भुस्कट पाडण्यासाठीं !

या साऱ्या प्रकारांत तात्याबा विहिरीवर जाण्याचं विसरून गेले होते. पण त्यांना एकाएकीं आठवण झाली. डोक्याला रुमाल गुंडाळून ते तरातरा विहिरीकडे गेले.

संध्याकाळ टळून गेली आहे. दिवेलागणी केव्हांच झाली आहे. घरांतलीं जेवणं आटोपलीं आहेत. विठा आणि बनूवहिनी परसदारीं भांडीं घाशीत आहेत. तात्याबा पत्त्याचा डाव खेळण्यासाठीं हरिबा कुळकर्ण्याच्या घरीं गेले आहेत. आप्पा आणि आत्याबाई पोथी ऐकण्यासाठीं देवळांत जाऊन बसल्या आहेत. काकींचा जीव उडून गेला आहे. त्या सारख्या आंत बाहेर करीत आहेत. तालुक्याला गेलेला दामू अद्याप आला नाहीं !

पोराला वेळ कां लागला ? वाटेंत चोराचिलटांनीं लुटलं तर नाहीं ? मारलं तर नाहीं ?

चिंतेनं काकी काळवंडल्या आहेत.

बाहेर चांदणं पडलं आहे. गार वारा सुटला आहे. तालुक्याहून येणारी वाट न्याहाळीत काकी उंबऱ्यांत उभ्या आहेत.

पोरगं कां आलं नाहीं ? कां आलं नाहीं ?

वाटेवरून कुणी तरी घराकडे येत आहे. काकींचं काळीज धडधडतं आहे.

' आलं माझं बाळ ! द्वाड मन चिंती तें वैरी न चिंती. कामालाच गेला होता. झाला असेल थोडा उशीर ! '

काकी पायऱ्या उतरून अंगणांत आल्या. दामू जवळ आला. अगबाई, दामू नव्हे हा ! कंडऱ्याचा भाना !

" काय रे भाना ? "

" काकी, वाईच अल्याड या. "

धडधडत्या छातीनं काकी आणखी पुढं झाल्या.

" का रे बाबा, भा ना ! काय झालं ? "

" तालुक्यासनं आलों. दामूला शिपायांनीं धरून ठेवलंय ! "

" कशाबद्दल रे ? "

" पाटल्या खोट्या होत्या. पितळेन्च्या. बँकेला फसवत होता म्हणून ! "

" अरे देवा ! "

पायांतून वारा गेल्यासारख्या काकी मटकन् पायरीवर बसल्या !

तात्याबा, आत्याबाई, आप्पा यांचा भाऊ म्हणून जन्माला आलेल्या बापूनं आपल्या बायकोलाहि बनवलं होतं !



# तूं माझी पक्षिणी

डिसेंबरांतली स्वच्छ दुपार. काळ्या-तांबड्या रानांतून हिरवीं गार पिकें उभीं होतीं. मोटा चालल्या होत्या. गुरं हिंडत होतीं. पक्षी उडत होते. पाणथळ भागांतील बाभुळवनांतून आम्ही हिंडत होतों. मी आणि रामोशाचा ईश्वरा. अंगानं छडछडीत. रंगानं काळा. थोडासा तोतरा. ईश्वरा हातांत डहाळे कुऱ्हाड घेऊन माझ्यापुढं चालत होता. त्याचे तीक्ष्ण डोळे बाभळीच्या हिरव्या डहाळ्यांतून फिरत होते. छऱ्याची बंदूक वागवीत मीहि हिंडत होतों. कुठें एखादा व्हला, पारवा दिसतो का, तें बघत होतों. आमच्या चाहुलीनें कावलेल्या खारी 'थंडर व्हिसल' सारख्या ओरडत होत्या. राखी रंगाच्या बारीक चिमण्या चिट् चिट् उडत होत्या. काळ्या कुळकुळीत अंगावर हिरवी झांक असलेले कोतवाल वाळल्या खनपटावर बसून शेपटी हलवीत होते. वर बघून चालतांना कधीं एकाएकीं पायापुढल्या गवतांतून भुर्रकन् लाव्हा उठे. तो दिसला कसा नाहीं अशी चुटपुट लागून राही. मान फुगवून घुमणाऱ्या व्हल्याचा आवाज कानावर येऊन ईश्वरा हलके हलके त्या दिशेनें जाई. बंदूक सुधारून मी त्याच्या मागोमाग असें. ईश्वराचे सराईत डोळे डहाळीवर बसून घुमणारा व्हला लागलीच हेरीत, पण मला तो दिसत नसे. आंधळ्यासारखा मी झाडाकडे बघत राहीं. दरम्यान् तें बुजरें पाखरूं सावध होई. पोटाशीं घेतलेल्या पायावर पुरें उभें राही. मान मोडून इकडे तिकडे बघे आणि फड्फड् करीत उंच उडे. नाराज होऊन मी त्याच्या भरारीकडे बघत राहीं. ईश्वरा कांहीं न बोलतां माझ्याकडे बघून असें हसे कीं, 'इतकें करून तुम्हीच चुकलां ! त्याला काय करायचें ! ' आणि मग फिरून आमची पायपीट चालू होई.

हिंडतां हिंडतां एका गर्द झाडावर कांहीं हलल्यासारखें झालें. जागच्या जागीं मी थांबलों. निरखून पाहूं लागलों. क्षणभर भ्रम झाला कीं हें पांखरूं कीं झाडाचें खनपट ? खात्री करून घेण्यासाठीं मीं ईश्वराला डिवचलें. एवढ्यांत तें पाखरूंही वळलें. आपले पिवळे धमक, भोकरासारखे मोठे डोळे रोखून माझ्याकडे बघूं लागलें. बसल्या जागींच, जोर काढल्यासारखें करूं लागलें. ईश्वरा कुजबुजला,

"पिंगळा."

"हाणूं का ?"

"काय जरूरी ? फुकट छरा दवडायचा ?"

त्या रामोशाची नजर शिकारीपेक्षां उपयुक्ततेवर अधिक होती. मला कांहीं तरी टिपायचें होतें. फडफड, धडपड आणि आपल्या हातानें केलेली शिकार बघायची होती. बंदूक उचलून मीं नेम धरला. ल्हान घुबडासारखें दिसणारें तें पाखरूं अजूनही रोखून बघत होतें. खालीं दबत होतें. वर उठत होतें. आळीपाळीनं ईश्वरा आम्हा दोघांकडे बघत राहिला. लक्ष्य टप्प्यांत येतांच मीं घोडा ओढला. फट्कन् आवाज झाला आणि त्याबरोबरच पिंगळा फडफडत खालच्या गवतांत पडला. मी पुढं धावलों. त्याला बंदुकीच्या दस्त्याखालीं चेंगरून विजयानें ईश्वराकडे बघूं लागलों. तो माझ्याकडे वळून म्हणाला,

"पिंगळ्याची मारली तर जोडी मारावी. आतां याची मादी जन्मभर एकटी ओरडत राहील !"

आणि खालीं बसून त्यानं तो मेलेला पिंगळा उलटा पालटा केला. पायाला धरून बाजूच्या घायपातांत भिर्कावला.

हिंडून हिंडून झिटावलों, पण कांहीं मिळालें नाहीं. रात्रीच्या कालवणापुरते दोन तीन व्हले केव्हां मिळतील, अशी घाई ईश्वराला झाली होती आणि उन्हानें रंजीस होऊन झाडांत बसलेल्या व्हल्यांनीं हें ओळखलें होतें. आमची चाहूल येतांच फडर करून ते बाहेर पडत आणि दूर निघून जात.

ईश्वरा चरफडून म्हणे,

"आमच्या लोकांनीं पाखरं भारी बुजार केलीं बघा सरकार. जो तो उठतो आणि गलोलीनं व्हले मारीत हिंडतो."

मग पुन्हां आम्ही ओढ्याच्या काठानें हिंडूं लागलों. करंज, बाभळ, निरगुडी यांची हिरवीगार दाटण लागली होती. त्या थंड सावलींतून बसलेले राघू शिळा घालीत होते. सालुंख्या बोलत होत्या. खारी ओरडत होत्या. गर्द पालवींतून, सोनेरी किरमिजी रंगाचा भारद्वाज चपलतेनें सरकत होता. उंबराच्या फांद्यांना वाघूळ लोंबकळत होते. नाना झाडांचा उबट वास. मधूनच ओढ्याचा गारवा बरोबर घेऊन येणारा मासळी दर्प. इतर सगळ्या गोष्टी विसरल्या आहेत. परीकथेंतल्या राजपुत्रासारखा मी या निबिड जंगलांतून भटकतों आहें.

एकाएकीं बांधावरच्या एका नेपतीच्या झुडपाशेजारीं ईश्वरा थांबला. नेपती, हिरवेंपिवळें गवत, रानवेल यांनीं गिचमडलेल्या त्या जंजाळांत कुऱ्हाडीचा दांडा खुपसून बघूं लागला.

" काय रे ईश्वरा, घरटें काय व्हल्याचें ?"

ईश्वराला ऐकूं गेलें नाहीं. तो थोडा बहिरट आहे हें ध्यानांत येऊन मी पुढं गेलों. वाळवंटांतून गुरांचे खूर उमटले होते. ओल्या वाळूंत उठलेल्या खुरांत पाणी सांचलें होतें. पाण्याची खळखळती धार उन्हांत चमकून डोळे दिपवीत होती. हिरव्यागार लव्हाळ्यांत काटकोळ्या पायाचा पांढरा शुभ्र बगळा शांत बसला होता. आणि आपट्याच्या फांदीवर व्हल्याची जोडी डुलकी घेत होती. क्षणभर छातींत धडधड झाली. मागें वळून बघितलें. ईश्वरा नजरेच्या टप्प्यांत नव्हता. दबत दबत आडोशाला गेलों आणि नेम धरून छरा सोडला. पाखरें भर्कन् उडून गेलीं. इतक्या जवळ जाऊन नेम कसा चुकला ? अरेरे. तरी बरें, ही फजिती बघायला ईश्वरा नाहीं !

स्वच्छ आभाळांतून भरारी घेत ओढ्याच्या पलीकडे जाणाऱ्या त्या जोडीकडे बघत मी उगाच उभा राहिलों.

आणि मागून ईश्वराची हांक आली,

" सरकार, या इकडं ! "

त्याच्या हातांत कांहीं होतें. माझ्या माघारीं यानें कशाची शिकार मिळवली ? उत्सुकतेनें धावत पळत मी त्याच्यापाशीं गेलों. हातांतली नेपतीची फांदी पुढं करून तो म्हणाला, " ही घ्या शिकार. "

त्या फांदीला मोहळाचा पिवळा तांबडा कांदा होता. मधाचे घट्ट थेंब खालीं ठिबकत होते.

" घ्या हातावर. खा."

दोघेही पाण्याच्या धारेंत गेलों. मीं घामानं चिकचिकलेलें तोंड धुतलें. हात धुतले. माझ्या ओंजळींत ईश्वरानें कांद्याचा मोठा भाग पाडला. मधानं ओंजळ भरली. तो चविष्ट, गोड मध मीं जिभेनें लपालप चाटला. ईश्वरानें विचारलें,

" कसा आहे रानचा मेवा ?"

जिभल्या चाटीत मी म्हणालों, " फसकलास !"

ईश्वराचा काळा चेहरा उजळून निघाला.

" या दिवसांत माझा उद्योग हाच बघा. तरी अजून करब्याचीं फुलं फुललीं नाहींत. नाहीं तर मोहळांना तोटा नाहीं. पोटभर खावीं."

" गड्या, तूं हेरलेंस बरें ! मला तर तिथं कांहीं दिसलें नाहीं !"

" कसबाचं काम आहे सरकार. हें सगळं रान माझ्या माहितीचं आहे. दरसाल त्या नेपतींत मोहळ मिळतंच !"

" काढलेंस कसें ? माश्या नाहीं चावल्या ?"

" चावरं नव्हतं तें. आणि जरी असलं तरी तोंडावर पटका घ्यायचा. लांबूनच फांदी हलवायची. माश्या उडून जातात !"

मी अडाण्यासारखा विचारीत होतों आणि ईश्वरा उत्तरें देत होता. त्याचे लाल डोळे चमकत होते.

" पण गड्या, व्हला कांहीं मिळत नाहीं !"

" नाहीं कसा ! चला त्या समोरच्या झाडींत. लागंल तितके व्हले मारा. हात अंतरावर गेलां तरी उडायचे नाहींत. आमच्या लोकांचा वावर इकडं नसतो फारसा. पाखरं बुजाट नाहींत तिथलीं !"

उन्हाच्या तावानें माझें तोंड तांबडें लाल झालें होतें. अंग घामानें थबथबलें होतें. पाय दुखूं लागले होते. खांद्यावरची जड बंदूक आणि खिशांतले शिशाचे छरे अधिक जड लागत होते. तरीही मी चालत होतों. ईश्वरा विचारीत होता,

" दमलां काय सरकार ?"

" छे ! संध्याकाळपर्यंत माघारीं फिरायचं नाहीं. जायचं तें तुझ्या कालवणाची बेगमी करून !"

मग पुन्हा एकवार आम्ही बाभळीच्या दाटींत घुसलों. पानाफांद्यांच्या सावलीनें डागळून व्हल्याच्या मागावर हिंडूं लागलों. ईश्वरा म्हणाला तें खरें होतें. या

झाडींत खूप पांखरें होतीं. आम्ही झाडाखालीं जाऊन बंदूक उचलली तरी तीं न उडतां टका टका बघत राहात. बद्कन् छरा छातींत घुसतांच मुंडी खालीं करून कोसळत. घू घू ओरडणारे कबुतरासारखे पांढरे व्हले. ‘ ये ग कू , दोघं जेवूं ’ असा आक्रोश करणारे बदामी रंगाचे लहान व्हले. ‘ कुटर्र कुटर्र ’ करीत धीटपणें बसणारे जांभळट व्हले. छरे लागून बदाबद खालीं कोसळले. ईश्वराजवळ चांगलें गांठोडें झालें. आम्ही परत फिरलों.

ओढ्याच्या काठाकाठानें परत येतां येतां, आणखी कांहीं मिळतें का, यावर नजर होतीच. संध्याकाळ झाल्यामुळें पांखरें आतां विसाव्याला आलीं होतीं.

“ ईश्वरा, गांवापासून बरेच लांब आलों. संध्याकाळ झाली ! ”

“ होऊं द्या. जाऊं आत्तां. नजर ठेवून असा झुडुपावर. हमखास घावंल एखादा.”

आणि जरा पुढें जातों तों एक दिसलाही. बाभळीच्या बुंध्याशींच असलेल्या कोव्यांत तो निवान्त बसला होता. आमची चाहूल लागतांच कावराबावरा होऊन बघूं लागला. घाई करून मीं छरा भरला. नेम धरला. घोडा ओढला. झुइई करून छरा निघून गेला.

“ च् च् , चुकला बेटा ! ”

“ पुन्हा हाणा, उठत नाहीं. तो अंड्यावर बसलाय ! ”

जवळ जाऊन मीं पुन्हा छरा मारला. तोही चुकला. रेंज बदलून मीं पुन्हा छरा भरला. ईश्वरानें सूचना दिली,

“ सावकाश हाणा, तो उडत नाहीं. ”

आणि मग मात्र तो उडाला. दोन पांढरीं शुभ्र अंडीं सोडून उडाला. मीं ईश्वराकडे सहेतुक बघितलें.

कमरेची पिशवी काढून तो म्हणाला,

“ या जरा इकडं. आडोशाला बसून पान खा. तोंवर तो पुन्हा येतोय बघा. अंडीं सोडून जातोय कुठं ! ”

आडोशाला बसून आम्ही पान खाऊं लागलों. सूर्य मावळायला आला होता. रानोमाळ पिवळ्या उन्हाची झळाळी काळवंडत चालली होती.

मी म्हणालों,

“ ईश्वरा, बेगमी झाली का ? ”

" हां हां, झाली की ! सातआठ मिळालं, आणखी हा मिळतोय् बघा. अंड्याची माया जीव घेणार त्याचा ! "

पांच एक मिनिटांनीं ती मादी फिरून कोठ्यावर येऊन बसली आणि पंखांत छरा घुसून खालीं कोसळली. धोतर कांखेला मारून ईश्वरा धावला. गवतांत घुसूं बघणाऱ्या जखमी मादीला त्यानें पकडलें. त्याच्या हातांत ती फडफड करूं लागली. तेव्हां जीव जाण्यासाठीं त्यानें ती जोरांत जमिनीवर आपटली. आणि इतर व्हले असलेल्या गाठोड्यांत बांधून टाकली.

गांवांत पोंचलों तेव्हां जेवणवेळ टळून गेली होती. ईश्वरा रामोशवाड्याकडे वळला. मी घरीं आलों. दरवाजा उघडून आंत गेलों. समईच्या प्रकाशांत अंथरुणावर बसलेली आई कोमल आवाजांत म्हणत होती,

" तूं माझी पक्षिणी, मी तुझें अंडज
देई प्रेमरज विठाबाई "

माझी चाहूल लागतांच तें अर्धवट सोडून म्हणाली,

" रमणा, किती रे उशीर बाबा ? "

" जेवणं झालीं आई ? "

" जेवलीं बाबा सगळीं. मीच राहिल्येंय् तुझी वाट बघत. "

" उपास सुटायचा तुझा. कशाला राहिलीस ? जेवून घ्यायचं ! "

" कशी रे जेवूं तुला सोडून ? "

जमिनीला तळहाताचा रेटा देऊन आई उठली. आणि अंड्यावरची ती पक्षिणी डोळ्यासमोर येऊन माझें मन हललें ! द्रवलें !



# अमीनची चित्तरकथा

रात्रीं भाकरी खाऊन झाली तेव्हां तिखट कालवणानं पोळलेल्या तोंडांत वारा घेत तात्या अमृता बायकोला म्हणाला, " मी जरा चावडीकडनं जाऊन येतों ग. "

जेवणखाण आटपल्यावर, दिवसभर रानांत राबलेली मंडळी चावडीपुढं जमा होत. धुळींत बसून इकडच्या तिकडच्या गप्पा ठोकीत आणि मध्यानरात्रीं घराकडं येत. एकमेकांच्या गाठी पडण्याचं, गांवांतली कमी अधिक बातमी समजण्याचं तेंच ठिकाण होतं.

बायकोच्या हुंकाराची वाट न बघतां, घोंगड्याची खोळ घेऊन तात्या अमृता बाहेर पडला.

काळोख किट्ट होता. थंडी जोरांत सुटली होती. कान आणि तोंड घोंगड्यानं झांकून तात्या अमृतानं अंगाचा संकोच केला आणि नेहमींच्या सरावानं दगडाधोंड्याला, लाकुडफाट्याला न थटतां तो जाऊं लागला.

एका बाजूला जळणासाठीं साठवलेला बाभळीचा फेस होता. त्याच्या पलीकडे उघड्यावर बैलाची दावण होती. जरा समोर पाण्याचा अरुंद आड होता. तसल्या अंधारांतही या सगळ्या गोष्टी तात्या अमृताला दिसत होत्या. त्या टाळून तो चावडीकडं जात होता.

दिवसभर कामं करून दमलेलीं बैलं निवान्त बसलीं होतीं. त्यांचे श्वास ऐकूं आले. शेणामुताचा वास आला. बैलांच्या अंगावरून तात्या अमृता पुढं गेला. आडाच्या बाजूनं जाऊं लागला. आजुबाजूला दगडी शिळा टाकल्या होत्या तरी तिथं राड होतीच. पाणी गोडं असल्यामुळें या आडाला वर्दळ फार होती.

शेजारचं न्हाव्याचं घर, मोमिनाचं घर आणि पलिकडचा एकांडा लव्हार यांच्या धरीं आड नसल्यामुळं त्यांना खर्चाचं पाणी सुद्धां याच आडाचं न्यावं लागे. पोवऱ्यांतून सांडलेल्या पाण्याचे ओघळ आजुबाजूला वहात. त्यामुळं तिथं राड हमेशा होई.

त्या राडींतून बेतानं जोडा उचलीत तात्या अमृता जाऊं लागला आणि एकाएकीं थबकला. जागच्या जागीं उभा राहून सावट घेऊं लागला.

पाण्यांतून गुड्गुड्गुड् आवाज येत होता. आणि आडाशिवाय दुसरीकडं कुठं पाणी नव्हतं.

कानावरचं घोंगडं काढून तात्या अमृता पुन्हा सावट घेऊं लागला.

कुणी तरी हलकेंच विव्हळलं; कण्हलं.

आवाज आडांतूनच येतो आहे ही खात्री झाल्यावर —

तात्या अमृता हलकेच आडाच्या काठाशीं गेला. ओणवा होऊन चाचपडूं लागला. गार कांठ हाताशीं येतांच डोकावून आंत बघूं लागला. पण काळोख किट्ट होता. कांहीं दिसत नव्हतं. मान वांकडी करून त्यानं पुन्हा सावट घेतला.

पुन्हां आंत कुणी विव्हळलं. खोल आडांतून तो आवाज तात्या अमृताच्या कानीं आला. त्यासरशीं तो वरून म्हणाला,

" हय् ! कोण हाय् आंत ? आं ? माझ्या आडाचं पाणी कोण खड्ळतोय ? "

आंतून आवाज आला नाहीं.

कानावर हात ठेवून तात्या अमृता ऐकूं लागला. पण आवाज आला नाहीं !

" कोण मरायला उतरलाय माझ्या आडांत ? कोण आहे ? तोंड नाहीं का बोलायला ? "

" आवाज नाहीं ! घरांतून दिवा घेऊन आंत बघितलं पाहिजे ! "

वारा भरारून सुटला होता. घरांतला कडू तेलाचा दिवा टिकला नसता. तात्या अमृता थेट न्हाव्याच्या घराकडं गेला.

बंडा न्हावी तंबाखू ओढीत बसला होता, त्याला म्हणाला,

" काय चाललय् बंडा ? "

सावरून नीट बसत बंडा उत्तरला,

" बसलोय् निवान्त ! भाकरी खाल्ली का ? "

" व्हय. तूं ? "

" खाऊनच बसलोया न्हवं, घ्या चिलिम ! "

" चिलिम नको. कंदिलांत तेल असंल तर बघ. जरा आडाकडं चल आमच्या ! "

" कां ? रेडकू बिडकू पडलं काय ? "

" रेडकू नाहीं. माणूसच असावं, अंधारांत दिसंना कांहीं. चल् कंदील घिऊन !"

बसल्या बसल्याच बंडानं पोरगीला हुकूम सोडला.

" खंदीलांत तेल हाय का ग ? असलं तर पेटव आणि आण ! "

तात्या अमृताच्या जीवाची घालमेल चालली होती.

आडांत कोण आहे हें बघण्याची उत्सुकता पराकोटीला पोंचली होती आणि कंदील बाळगून असलेला बंडा अगदीं थंड होता.

बंडाची पोरगी उठली. अंधारांतच आंतल्या खोलींत गेली. खुंटीला अडकविलेला कंदील तिनं बापाच्या हातीं आणून दिला. तो बऱ्याच दिवसांत पेटवला नव्हता. धुळीचीं किटणं त्यावर सांचलीं होतीं. काच फुटल्या जागीं कागद डकवून सांधली होती. त्याच्या दोन्ही बाह्या धरून बंडा म्हणाला,

" तेल नसंलच ! "

आणि कानापाशीं नेऊन कंदील हलवूं लागला.

तात्या अमृता वरचेवर अंधारांतून आपल्या आडाकडं बघत होता. कान देऊन बघत होता कीं, विव्हळणं ऐकूं येतं का ? पण कांहीं ऐकूं येत नव्हतं !

टाकींतलं तेल हललं. तो आवाज ऐकला तेव्हां बंडा थंडपणानं बोलला,

" तेल हाय् असं वाटतंय ! "

" मग पेटव कीं मर्दा. चल् लवकर. "

तात्या अमृता घाईला आला होता.

बंडा बेतानं उठला. हातांत कंदील घेऊन चुलीपाशीं गेला. एक चिपाड विस्तवावर धरून फुंकूं लागला. करपट वास आणि धूर यांचा भपकारा त्याच्या तोंडावर आला, तेव्हां तो डोळे चोळूं लागला. पुन्हां वाकून फुंकूं लागला. चिपाडानं पेट घेतला. कंदिलाचा घोडा खालीं करून बंडानं जळतं चिपाड आंत घातलं आणि वात पेटवली. घरांतल्या दिव्यापेक्षां अधिक उजेड झाला.

कंदील हलवीत दोघेही आडापाशीं आले. बंडा ओणवा होऊन कंदिलाच्या

उजेडांत आंत बघूं लागला, तरीही खूप खोल असलेल्या आडाच्या अर्ध्या भागापर्यंतच दिसूं शकलं.

नेतां येईल तेवढा कंदील आंत नेऊन बंडा म्हणाला,

"काय दिसतंय का ताल्या?"

पटका उराशीं धरून बोडक्या डोक्यानं आंत डोकावून बघणारा ताल्या अमृता म्हणाला,

"नाहीं बा. तुला दिसतंय?"

"नाहीं. काळोख किट्ट हाय् आंत!"

"मग कसं करतोस?"

"आंत हाय का तरी कुणी?"

"तर तर! मी मघा इवळणं ऐकलं. आंत हाय कुणी तरी!"

मग बंडा ओणवा झाला आणि ओरडला,

"कोण हाय आंत — आं?"

आणि कानावर हात ठेवून आवाजाची वाट बघूं लागला.

"तसा फायदा होणार नाहीं बंडा. थांब!"

शेजारचा एक बारीक खडा घेऊन ताल्या अमृतानं आंत टाकला. तो जातां जातां बाजूला थटला आणि मग डुबुक्कन् पाण्यांत पडला.

त्यापेक्षां थोडा मोठा खडा घेऊन बंडानं बरोबर मधें सोडला तेव्हां बदकन् आवाज आला. कुणीसं विव्हळलं,

"आँ — ये मॉ ... हाय ..."

डोळे मोठे करून न्हाव्याकडे बघत ताल्या अमृता म्हणाला, "बघ! सांगत नव्हतों आंत कुणी तरी हाय!–" आणि मग तो मोठमोठ्यानं ओरडूं लागला,

"हय् — कोण पडलय् आंत! आवाज दे, आवाज दे!"

त्याला मधेंच थांबवून बंडा म्हणाला,

"ताल्या, आमची म्हातारी तर नव्हं?"

"तुझी म्हातारी? असंल! कुणी नेम सांगावा?"

बंडा उठून उभा राहिला. घराकडे बघून हाळ्या मारूं लागला,

"ये कोंडे, कोंडे — हय!"

कोंडीनं तिकडून आवाज दिला,

" वं–कां वं ?–"

" अग, आपली म्हातारी हाय का घरांत ? "

" आँ ? काय ? "

" म्हाता–म्हातारी हाय का बग घरांत ! "

कांहीं वेळ सामसूम झाली. आवाजाची वाट बघत दोघेही थटून राहिले.

विहिरींतलं पाणी खळबळल्याचा आणि विव्हळण्याचा आवाज पुन्हा एकवार आला !

त्या पाठोपाठ तिकडून कोंडी ओरडली,

" म्हातारी हाय व घरांत ! पडलीया जात्यापशीं ! "

तें ऐकून बंडा बोलला,

" मग व तात्या, कोण असावं दुसरं ? "

दरम्यान ही आरडाओरड ऐकून तात्याची बायको दाराशीं येऊन उभी राहिली होती. तिनं विचारलं,

" काय वं, काय हाय ? "

तात्या अमृता म्हणाला,

" कुणी तरी आडांत पडलंय् ! "

" कोण ? जनावर ? "

" नाहीं. माणूस ! "

" आं ? अवं मग बगा तरी ! काढा तरी वर ! "

दोघांनीं मिळून विचार केला.

" तात्या, दिस उगवल्यावांचून काय इलाज नाहीं ! "

" तोवर थांबावं म्हणतोस ? "

" हां. तर काय ? "

पण बायको तिकडून ओरडली,

" मरंल कीं थंडीनं तोपतूर आंतलं माणूस ! दोरीला बांधून खंदील सोडा आंत आन् कुणीतरी उतरून काढा त्याला वर ! "

" हे बि खरंच. मग रं बंडा, उतरतोस आंत ? "

" आपण न्हाई बाबा. कधीं जल्मांत आडांत उतरलों नाहीं आपण. खबदाडींतून साप असतात ! कुणी धाडस करावं ? "

" मग ? "

" लव्हार उतरंल बघा. त्याला सवय हाय् ! "

" ठीक ! "

तात्या अमृताला ही कल्पना पसंत पडली. तो तरातरा लव्हाराकडे गेला आणि म्हणाला,

" लव्हारा, जरा भायेर ये. काम हाय्. "

लव्हार अद्याप झोंपला नव्हता. लंगोटा लावून अंथरुणांत पडला होता. तो उठला आणि लगबगीनं धोतर गुंडाळीत म्हणाला,

" कोण ? तात्याबा काय ? "

" हां. भायेर ये ! "

चादरीची खोळ घेऊन लव्हार बाहेर आला. खाकरून थुंकला आणि म्हणाला,

" का वं तात्याबा ? "

" आमच्या आडांत कुणी पडलंय्. उतरून काढशील का ? "

" अंधार हाय की वं ! असल्या थंडींत पाण्यांत पडलों तर गारव्यानं मरीन ! "

" खंदील हाय बंडा न्हाव्याचा उजेडाला. गारठलास तर शेक चणाचणा. मी चगळ देतों माझ्यातलं ! "

लव्हार मिंधा होता. त्याला तात्या अमृतासारख्या तालेवाराचा शब्द मोडवेना. काचकुच करीत तो तयार झाला. म्हणाला,

" बरं, तुमी म्हणताय तर उतरतों. चला ! "

लव्हाराला पुढं घालून तात्या अमृता आडापाशीं आला. तोंवर आणखी एकदोघं तिथं जमलीं होतीं. गारठ्यानं आखडल्या तोंडानं, आडांतला माणूस कोण असावा, याची चर्चा मंडळी अजूनही करीत होती.

लंगोट लावून लव्हार तयार झाला. दोराला बांधून कंदील आंत सोडतांच, कुणी तरी माणूस आंत दिसला. तो पार गळ्याइतका बुडाला होता. आडांत पाणी कमी होतं. त्यामुळं तो उभा राहूं शकला होता. दोन्ही हातांनीं दगडाला धरून राहिला होता.

लव्हार म्हणाला,

" कुणी तरी गडी दिसतोय खरा ! "

" गावांतलाच हाय का परगांवचा ? "

" तोंड नीट दिसत नाहीं ! "

" बरं, आवर. हो आंत. वर काढल्यावर कळंल ! "

लव्हार बेतानं आंत गेला. आडाच्या दोन्ही बाजूना असलेल्या पायऱ्यांवर फासटलेले पाय देत, हातांनीं आधार घेत खालीं जाऊं लागला.

बाजूशीं ओणवी होऊन सगळी मंडळी आंत बघूं लागली. सूचना देऊं लागली,

" बेतानं रे लव्हारा ! तोल संभाळ ! "

लव्हार काळजी घेतच होता. निसरड्या दगडावरून त्याचे पाय सरासर घसरत होते. पण दोन्ही बाजूंना हात रेटून तो खालीं जात होता. एक एक पाय जपून जात होता. फासटल्यामुळं त्याच्या मांड्यांना रग लागत होती.

मंडळीची उत्सुकता वाढत होती. हातभर माना काढून सगळे आंत बघत होते. तोल संभाळून लव्हारावर नजर ठेवीत होते.

दारांत उभी राहिलेली तात्या अमृताची बायको तिथून विचारीत होती,

" गेला का तळाला ? "

आंत बघणारा तात्या अमृता ओरडून सांगत होता,

" नाहीं. पर जवळ जवळ गेलाय. "

" मग दिसत असंल कीं कोण हाय तें ! "

मग तात्या अमृता लव्हाराला विचारीत होता,

" दिसतंय का रं, कोण तें ? "

लव्हाराकडून नकार आला कीं आंत घातलेलं डोकं वर काढून बायकोला सांगत होता,

" नाहीं ग, नाहीं ! "

अखेर लव्हार तळाशीं पोंचला. कंदिलाच्या उजेडांत त्याला पाण्यांत उभ्या राहिलेल्या गड्याचा चेहरा दिसला. डोळे मिटून दांतावर दांत वाजवीत, गारव्यानं काकडून गेलेला तो गडी गप् उभा होता.

वरून बंडानं विचारलं,

" कोण हाय रं ? "

आवाज उंचावून लव्हार म्हणाला,

" कुंबडा अमीन ! "

" मोमीनाचा ? "

" हां ! "

" थूत् लेका ! अरं आंत कशाला उतरलास म्हणावं मरायला ? "

चौकोनी चेहऱ्याचा, मोठ्या कानांचा अमीन गारठ्यानं अर्धमेला झाला होता. त्याच्या हनुवटीवर असलेली बोकडासारखी दाढी पाण्यानं निथळत होती. त्यांच्या रुंद जबड्यांतले, करड्यासारखे दात एकमेकांवर खटाखटा आपटत होते.

लव्हार त्याच्या शेजारीं पाण्यांत उभा राहिला. त्याच्या गुळगुळीत डोक्यावर थापट्या मारून म्हणाला,

" ए कुबड्या, सावध हो सावध ! "

अमीननं डोळे उघडले. तोंडानं चमत्कारिक आवाज केला आणि कपारीचे हात सोडून लव्हारालाच मिठी मारली.

तसा लव्हार ओरडला,

" अरं अरं ! मला कां मिठी घालतोस ? थांब थांब ! "

पण मोमिनानं त्याला सोडला नाहीं. तो बुटका आणि कुबडा माणूस माकडाच्या पोरासारखा लव्हाराला चिकटला.

वरून बंडा ओरडला,

" का रं लव्हारा ? "

पाण्यांत पडलेल्या घुशीसारखा धडपडत लव्हार ओरडला,

" चांगलं वेड आणलं मोमिनानं ! बंडाप्पा, दुसरा दोर फेका आंत. कमरेला फास लावून ओढून घ्या त्याला वर ! "

धावाधाव झाली. दुसरा दोर आंत फेकला गेला. लव्हारानं अंगाशीं डसलेल्या खुळ्या अमीनला झिंजाडून सुटा केला. पाण्यांत गटांगळ्या खात तो ओरडूं लागला,

" अगे मा गे ! या अल्ला रे ! अभी मरता हूं ! "

त्याची मानगूट धरून वर उचलीत लव्हार म्हणाला,

" मरायचं न्हवतं तर कशाला उडी घेतलीस रं आंत ? आं ? "

वरच्या मंडळीपैकीं कुणी तरी म्हणालं,

" अराररा ! भावानं केलेल्या जाचानं जीव दिला कुबड्यानं ! "

त्याला कुणींतरी उत्तर दिलं,

" काळ आला पर येळ आली नाहीं ! आडांत पाणी थोडकं असल्यानं मोमीन बचावला ! "

या गोष्टी बंडालाही पटल्या. तो म्हणाला,

" ह्या लोकास्नी काळीजच नाहीं ! "

दरम्यान लव्हारानं मोमिनाच्या कमरेभोवतीं जाम फांस घातला होता. जागोजाग त्याला जखडला होता. दोर हलवून त्यानं इशारा दिला,

" हं ! घ्या वर बेतानं ! "

मग मंडळींनीं नेट लावून मोमिनाला वर शेंदून काढला. फासांतून मोकळा केला.

खालीं बसल्या बसल्याच तो सगळ्यांच्या तोंडांकडं आपल्या खुळ्या डोळ्यांनीं बघूं लागला, तेव्हां त्याला धीर देऊन तात्या अमृता म्हणाला,

" भिऊं नकोस अमीन ! तुला कुठं लागलय् का ? "

तरी तो वेडा तसाच बघत राहिला.

" अरं बोल की ! लागलं का कुठं ? "

थंडीनं लटालटा कांपणारा अमीन बोलला नाहीं. दांतावर दांत वाजवीत बसूनच राहिला.

लव्हार वर आला आणि कोरडे कपडे घालीत म्हणाला,

" तात्याबा, चगळ पेटवा. मला शेकूं द्या ! "

लव्हार शेकत बसला. न्हाव्यानं आणि तात्या अमृतानं अमीनला धरून त्याच्या घराकडे नेला. त्याचा थोरला भाऊ दिवा विझवून झोंपला होता. तो हळ्या ऐकून जागा झाला. म्हणाला,

" कोण हाय् ? "

" दार उघड पयलं. तुझा अमीन आडांत पडला होता ! "

दिवा लावून मोमिनानं दार उघडलं. भावाला आंत घेतला. आंत शिरतांच दुखावल्या मांजरासारखा कुबडा मोमीन एका कोपऱ्यांत शिरून बसला.

बंडा म्हणाला,

" तुमा लोकांना काळीजच नाहीं ! आम्ही बघितलं म्हणून बरं, नाहीं तर अमीन आज जगत नव्हता ! "

" कां बरं ? काय झालं ? "

तात्या अमृता म्हणाला,

" आमच्या आडांत पडला होता ! "

" आडांत ? कशाला मरायला गेला होता रात्रीं तिकडं ? "

" तें काय तें तुमचं तुम्ही बघा ! "

बंडानं पुन्हा दोष दिला,

" येडं खुळं हाय तें, तर त्याला नीट संभाळलं पाहिजे तूं ! दिवसभर मागांत बसवून पासोड्या विणून घेतोस त्याच्याकडनं. त्याच्यावर पैका मिळवतोस. मग अशी हेळसांड कां ? "

मोमीन हातवारे करीत म्हणाला,

" कोन करतय हेळसांड ? त्याला इचारा बघूं — " आणि अमीनपुढं जाऊन तो ओरडला, " होय रं ? मी तुला कधीं बिगर भाकरी ठेवलाय् ? वर्साच्या वर्साला कापडं करायची राहिलोय् ? आं ? बोल ! "

पण अमीन गुढगेमिठी देऊन बसला होता. तो बोलला नाहीं. त्याच्या कमरेभोंवतीं ओलं: धोतर तसंच होतं. पाठीचं कुबड काढून तो गप् बसून राहिला. पासोड्या, अटपळी विणायच्या मागांत बसून बसून बुटका अमीन कुबडा झाला होता, का त्याचं तें व्यंग जन्मल्यापासूनचंच होतं, कोण जाणे. उंचीनं बुटका असलेला हा मुसलमान स्वभावानं अगदींच अबोल, खालमुंड्या होता. बाहेरच्याशीं नाहीं तें नाहीं, पण घरच्या माणसाशींसुद्धां तो क्वचित् बोले. त्याची शादी झाली नव्हती. वयानं चाळिशीच्या आसपास असावा. डोळ्यांत नेहमीं वेडाची लहर दिसे. पण तसा तो वेडा नव्हता. भाऊ देईल तें खाऊन जनावरासारखीं कामं तो बिनचूक करीत असे.

अमीन बोलेना तेव्हां बंडा न्हावी पुन्हा म्हणाला,

" तूं जाचांत ठेवलास बघ त्याला ! त्रासून त्यानं जीव देण्यापायीं आडांत उडी घेतली ! "

हें ऐकून अमीनचा भाऊ रागानं हिरवापिवळा झाला ! तेव्हां तात्या अमृता न्हाव्याला म्हणाला,

" चल् रं, त्याचं तो बघील. आपलं काम झालं ! "

आणि ते दोघे बाहेर पडले.

मग मोमीन पुढं झाला आणि हातांत काठी घेऊन अमीनच्या अंगावर ओरडला,

" क्यूं रे साले ! तुला खायाप्यायला देतों, ल्यानेसायला देतों, आन् सुखासुखी आडांत जीव द्यायला तुला काय झालं ? माझी गांवांत नाचक्की करतोस ? "

आणि त्यानं कुबड्या अमीनला गुरासारख्या धोपाट्या घातल्या. अमीन कळवळला. त्याला म्हणायचं होतं कीं, ' मी जीव दिला नाहीं. पाणी आणण्यासाठीं आडाला गेलों. अंधारांत तोल जाऊन आंत पडलों. पवरा आणि दोर अजून आडाच्या तळाशीं आहे. ' पण तो बोलूं शकला नाहीं. नुसता कळवळत राहिला !

आणि त्याच्या वागणुकीनं नाचक्की झालेला मोमीन त्याला गुरासारखा बडवीत राहिला !



# जुगार

माझा जुगारावर विश्वास नाहीं. अगदीं बिलकुल नाहीं. शपथपूर्वक सांगतों कीं शब्दकोडीं सोडविण्यासाठीं मीं आजपर्यंत कधींही पेन्सिलीचें टोंक थुंकीनें भिजविलें नाहीं. लॉटरीचीं तिकिटें खरीदलीं नाहींत. रमीचे डाव टाकले नाहींत. शब्दकोडीं असलेलीं वर्तमानपत्रें मीं कधीं उघडलीं, तर तीं माझ्या पुस्तका-वरचा अभिप्राय किंवा कशाही निमित्तानें छापून आलेलें माझें नांव वाचण्यासाठीं. लॉटरीचीं तिकिटें मीं बघितलीं आहेत तीं पानपट्टीच्या दुकानांत फडफडतांना. आणि पत्त्यांतील जुगारी डावाविषयीं बोलायचें तर, ‘ पांच तीन दोन ’ पलीकडे माझी मजल गेलेलीच नाहीं !

रोज सकाळीं वर्तमानपत्र आणण्यासाठीं माधववाडीच्या दुसऱ्या मजल्यावरून उतरून जेव्हां मी खालीं येतों आणि दुकानांत जातों, तेव्हां शब्दकोडीं असलेल्या वर्तमानपत्राच्या ढिगाऱ्यांतून साधा मराठी पेपर हुषारीनं काढून घेतों. काखोटीला मारतों. दरबारसमोर हिरवीं पिवळीं ठिगळें जोडलेला बुशकोट, गळ्यांत चट्टेरीपट्टेरी मफलर, डोळ्यांना पांढऱ्या फ्रेमचा गॉगल, असला चमत्कारिक पोषाख केलेला एक विलक्षण माणूस हातांतलीं छोटीं बुकें वर करून सारखा ओरडत असतो, ‘ मो ऽ ऽ तीय् मोतीय् ! ’ – म्हणजे काय परमेश्वर जाणे !– पण माझी अशी समजूत आहे कीं आंकडा किंवा रेस यांविषयीं मजकूर असलेलीं बुकें तो विकतो. त्याच्या जवळून मी नेहमीं निर्विकारपणें जातों. माझा एक चांगल्यापैकीं मित्र रेसचा इतका वेडा आहे कीं, आपल्या अपत्यांना त्यानें घोड्यांचीं नांवें ठेवलीं आहेत ! कुठल्याही माणसापेक्षां घोड्यावर त्याचा जास्ती विश्वास आहे ! आणि, रेसच्या मैदानांतून आपण पळतों आहों आणि तमाम

घोडे डोळयाला दुर्बिणी लावून बघत आहेत, असलीं स्वप्नें त्याला पडतात! सिनेमा कंपनीचे मालक असलेले एक हुषार गृहस्थ सारखे अडीच दिवस रमी खेळत बसलेले मला माहीत आहेत. आणि बेचाळीस सालीं सांगलीला असतांना 'आंकड्या'च्या नादानें सर्वस्व घालवलेला एक व्यापारी मीं बघितला आहे!

सभोंवार चाललेला हा भयंकर जुगार बघून, माझा जुगारावर विश्वास नाहीं ही गोष्ट जाणवून मी स्वतःवर विलक्षण खूष होतों. आजुबाजूला जुगाराचीं हीं इतकीं साधनें असतांना त्यांपासून अलिप्त राहणारा मी खरोखरीच मोठा माणूस नव्हे काय? हा विलक्षण संयम माझ्यापाशीं कसा आला? असें असणें शक्य आहे कीं, जुगारासारखी असभ्य आणि जोखमीची गोष्ट करण्याइतपत धैर्य अंगीं नसल्यामुळें मी त्यापासून बाजूला आहें. असें असतें. चोरी न करणारीं पुष्कळशीं माणसें चोरी करण्याचें धैर्य आणि हुषारी अंगीं नसल्यामुळें सभ्य आणि चांगलीं राहिलेलीं असतात. पण माझें तसें नाहीं. असभ्य समजल्या जाणाऱ्या पुष्कळ गोष्टी मीं केल्या आहेत. अगदीं परवां परवां एका आयरिश लेखकाच्या गोष्टींतला कांहीं भाग आपल्या गोष्टींत आला आहे हें कळूनही त्याचा उल्लेख करण्याचें मीं टाळलें आहे! दुकानदारानें चुकून दिलेली जादा मोड निर्विकारपणें खिशांत घातली आहे! तिकिट न काढतां लोकलनें प्रवास केला आहे! अहो, मीं आणखी खूप केलें आहे! मग?

फार लहानपणापासून मला स्त्री आणि पुरुष यांतला फरक, त्यांचे परस्परांशीं असणारे संबंध कळत होते. बरोबरीच्या मुलीशीं तशा स्वरूपाच्या उलाढाली करण्यांत मी नेहमीं गढलेला असें. किंबहुना, त्या पोरवयांत माझी सारी हुषारी त्या एकाच गोष्टीवर केंद्रित झालेली असे!

त्या काळीं नवीनच बदलून आलेल्या मामलेदारांची सुलू मला फारच आवडली होती. गोरी गोरी पान. घाऱ्या डोळ्यांची. लाल लाल ओठांची. तिनें मला आपला प्रियकर समजावें अशी माझी फार इच्छा होती. म्हणून तिला एक सुरेखसें प्रेमपत्र लिहीत मी देवघराच्या आडोशाला बसलों होतों. एवढ्यांत आईची हांक ऐकूं आली. गिरणींतून दळून आणण्याचें रुक्ष काम तिनें मला सांगितलें. तसें तें रुक्ष नव्हतें. कारण गिरणींतला विठू दळायला आलेल्या बायकांशीं जो फाजीलपणा करी तो बघणें मला आवडत असे. पण सुलूला पत्र

लिहिण्याचे वेळीं हें काम येणें हा दैवदुर्विलास होता. मीं ओरडून आरडून आईला दमदाटी दिली,

" मी आणणार नाहीं दळून. मला अभ्यास आहे ! "

पण वडील माणसांना आणि त्यांतल्या त्यांत आईला वांड पोरांकडून कामें कशीं करून घ्यावींत हें बरोबर कळतें ! गयावया करून ती म्हणाली, " जा रे माझ्या राजा, शहाणा ना तूं ? " आणि मग स्तुतीच्या या गळाला तिनं सुरेख आमिष लटकावून दिलें. " खाऊ देईन तुला ! "

खाऊ हा मोघम शब्द मोठा फसवा आहे. निश्चित खाऊ वस्तूंचा बोध त्यामुळें होत नाहीं. आणि आईच्या बाबतींत तर त्या शब्दाच्या अर्थाला मुळींच निश्चितता नव्हती. मुगाच्या डाळीपासून तों तिळाच्या चार दाण्यांपर्यंत ती कांहींही जिन्नस खाऊ म्हणून देई ! हरबऱ्याची भिजकी डाळ, चिंचेचें बोटूक, शेंगदाणे, साखरेची चिमट असल्या अनेक चिजा खाऊ म्हणून ती आमच्या हातावर टिकवी. हा अनुभव असल्यामुळें मी शहाणा बनलों होतों.

" खाऊ काय देणार ? "

" देईन कांहीं तरी ! "

" कांहींतरी नको. काय देशील तें सांग ! "

" देईन खजुराच्या बिया ! "

वस्तु निश्चित झाली. पण तेवढ्यावरच करार करणें धोक्याचें !

" किती देशील ? "

" किती छळशील मेल्या ! "

" मग मी नाहीं आणणार जा ! "

" बरं बरं. देईन चार बिया. "

" सहा देशील तर आणीन ! "

" बरं देईन. जा ! "

विसारादाखल दोन खजूरबिया मीं वसूल केल्या आणि डोक्यावर दळणाचा डबा घेऊन दांडेकराच्या गिरणीकडं निघालों. दळणाबद्दल विठूला द्यावा लागणारा एक आणा गालांत ठेवून दिला. गूळखोबऱ्यासारखे पदार्थ खिशांत ठेविल्यामुळें माझ्या चड्डीचे खिसे नेहमींच उंदरांनीं कुरतडलेले असत. म्हणून पैशासारख्या मूल्यवान् वस्तू ठेवायला गालाचा खिसाच मी नेहमीं उपयोगांत आणीं.

डोक्यावर दळणाचा जड डबा घेऊन आणि तोंडांत आणा ठेवून, लंगडी घालीत जात असतांना, वाटेंतच मिराशी फौजदाराचा बंडू मला भेटला. बारीक डोळ्याच्या या गबदूल पोराएर्की माझ्या मनांत अपार आदर आणि थोडासा दरारा होता. कारण तो फौजदाराचा मुलगा होता. त्याचा शर्ट नेहमीं चड्डीच्या आंत खोचलेला असे. गोळ्या खाऊन तोंड चिकट झालें म्हणजे तें पुसण्यासाठीं तो हातरुमाल वापरीत असे. पुस्तकांचें कातडी पाकीट, चकचकीत बूट, आणि सायकल, असल्या भारी वस्तू त्याच्या मालकीच्या होत्या. आणि विशेष म्हणजे, संडासांत लिहितात तसल्या खूप गमती त्याला ठाऊक होत्या !

मी दृष्टीस पडतांच त्यानें आपले दोन्ही हात रुबाबदारपणें चड्डीच्या खिशांत कोंबले. बापाप्रमाणें मान वाकडी केली आणि म्हटलें,

" काय यार, कुठें निघालास ? "

त्यानें आपल्या दोन्ही पायांमध्यें अंतर ठेवलें होतें आणि टोपी अगदीं अव्यवस्थित घातली होती. कमरेच्या कातडी पट्ट्याचें टोक बेफिकीरपणें सुटूं दिलें होतें. गालांतला आणा सांभाळीत मी म्हणालों,

" दळून आणायला ! तूं ? "

" मी ? चाललोंय् जरा बाजाराकडे. जुगार खेळायला ! "

माझा आदर जास्ती वाढला. जुगार कसा खेळतात, हुतूतूसारखा कीं आट्यापाट्यासारखा, तें मला नीटसें माहीत नव्हतें.

" कसा खेळतां बुवा तुम्ही जुगार ? "

" हात् तिच्या ! त्यांत काय ? तूं येतोस का ? शिकवीन तुला ! "

मला मोह अनिवार झाला. पण डोक्यावर दळणाचें ओझें होतें. तोंड वाईट करून मी म्हणालों,

" आलों असतों रे ! पण मला दळून आणायचं आहे. "

" हात् तिच्या ! दळण काय, केव्हांही आणतां येईल. फार वेळ नाहीं लागणार. चार पांच रुपये मिळवलेस कीं परत फीर तूं ! "

जास्ती विचार न करतां मी त्याच्याबरोबर गेलों.

बाजारांत एका आडोशाला पाल ठोकलें होतें. बरीच गर्दी जमली होती. दोन्ही हातांनीं डोक्यावरचा डबा सांभाळीत मी त्या गर्दींत बंडूच्या पाठोपाठ घुसलों.

किलवर बदाम काढलेलें मेणकापड पुढें घेऊन सोनेरी दातांचा एक माणूस आरडाओरड करून लोकांना खेळण्यासाठीं उत्तेजित करीत होता. हातांतील डबडें खडबडावीत म्हणत होता,

"हय्; लाव्या लंबर, लाटया लंबर – रुपयावर शंभर रुपये! बाबा, बसून कमाई!"

आजूबाजूचे लोक आणा दोन आणे लावीत होते. सोनेरी दांतवाला डबडें पालथें टाकीत होता. किलवर बदामचे छाप असलेले ठोकळे उलथे पालथे पडत होते. कुणी आणा कमवीत होता, कुणी आणा गमवीत होता. लाव्या लंबरवाला ढीगानें पैसे ओढीत होता. खरोखर हें सारें विलक्षण होतें. थक्क करणारें होतें!

बंडू पुढें झाला आणि खिशांतून एक आणेली काढून त्यानें बदामवर लावली. आणखीही कुणीकुणी पैसे लावले. 'लाव्या लंबर' डबडें घोळूं लागला. माझी अधीरता वाढली. या जुगारांत बंडू आतां किती पैसे मिळवितो यासाठीं मी उत्सुकतेनें बघूं लागलों. आणि काय आश्चर्य, बंडूला पैसे मिळाले! एका आण्याला चार आणे मिळाले. नव्या उत्साहानें बंडू पुन्हां खेळला. पुन्हां त्याला डाव मिळाला. बंडू जिंकतच राहिला. आजूबाजूचे लोक म्हणाले,

"पोराचं नशीब मोठं आहे!"

लाव्या लंबरवाला डोळे मोठे करून बंडूकडे सारखा बघूं लागला. तरी पण बंडू भ्याला नाहीं. खेळतच राहिला. आणि आणेल्यांनीं त्याचा खिसा जड झाला.

मग माझ्याही अंगांत वारें शिरलें. बंडूचा खांदा ओढून मी म्हणालों,

"मला खेळूं दे ना! एकटाच काय खेळतोस?"

कारण त्यानेंच मला या वाटेस आणलें होतें!

मिळालेल्या रकमेमुळें बंडू इतका बेहोष झाला होता कीं, एक आख्खा आणा माझ्या तोंडावर फेकून तो म्हणाला,

"खेलो यार, खुषीसे खेलो!"

दळणाचा आणा गालांत नीट धरून मीं मांडी ठोकली. टोपी कलती केली. केंस कपाळावर आणले. चेहरा बदमाषासारखा केला आणि आणा लावला.

आजपर्यंतचा माझा अनुभव असा आहे कीं, दैव माझ्या बऱ्यावर आहे. जबरदस्त निराशेचे आसूड माझ्यावर ओढण्यांत त्याच्याकडून नेहमींच कुचराई होत आली आहे. मी आणा लावला आणि मला चार आणे मिळाले! त्याबरोबर

धूर्तपणें मीं बंडूचा आणा त्याला देऊन टाकला. तीन आणे गालांत ठेवले आणि डबा उचलून चालूं लागलों. पण सद्याच्या टोकाला धरून बंडूनें मला मागें ओढलें. म्हटलें,

" वा रे ! तीन आणे मिळाल्यावरच हरकलास काय ? अरे खेळ ! खिसा भर रुपयांनीं आणि मग जा ! "

खिसा भरण्याच्या कल्पनेवर मी फारसा खूष नव्हतों. पण बंडूनें हिणवूं नये म्हणून डबा ठेवून पुन्हा खेळायला बसलों. आणा लावतांना सुरुवातीला मी मनांतल्या मनांत देवाचं नांव घेई. तो कपाळाला लावीं. त्यामुळें मला भराभर डाव मिळत गेले. थोड्याच वेळांत माझ्यापाशीं एक रुपया जमला. सोळा आणे– ज्यांत मी 'लिंबू 'च्या बत्तीस बाटल्या पिऊं शकलों असतों ! टोपलीभर बटनबिस्किटें खाऊं शकलों असतों ! आणखी काय वाटेल तें करूं शकलों असतों ! मी बेहोष झालों. आणि सामान्यतः बेहोषीनें जें होतें तेंच घडलें. एक एक आणा करीत मी मिळविलेला रुपया तर हरलोंच, पण जवळचा एक आणाही घालवून बसलों ! तरीसुद्धां माझी बेहोषी उतरली नाहीं. बंडूकडे बघून मी ओरडलों,

" बंडू ! मला एक आणा दे ! "

तेव्हां बंडूनें मान हलवली. माझ्यासारख्या हरणाऱ्या माणसाला दिलेलें कर्ज म्हणजे कधींही परत न मिळणारी रक्कम हें त्याला कळत होतें. म्हणून त्यानें नकारार्थी मान हलवली. माझें वय अगदींच लहान होतें आणि विशेष समजही नव्हता. त्यामुळें दळण विकावें आणि जुगार खेळावा ही साधी गोष्ट माझ्या डोक्यांत आली नाहीं. डबा डोक्यावर घेतल्या-घेतल्या मी कांहीं वेळ खेळ बघत उभा राहिलों आणि मग सावकाशीनें गिरणीकडे गेलों.

धुराड्यावरचें मडकें उड्या हाणीत होतें. भुक्भुक् आवाज होत होता. आंत फळ्यांवरून टोपल्या-डब्यांचे नंबर लागले होते. उडालेल्या पिठानें पांढरा शुभ्र झालेला विठू बायकांची चेष्टा करीत होता. पण मी त्याची मजा घेऊं शकलों नाहीं. नंबर लावून उगीच उभा राहिलों. विठू उधार दळून देणार नाहीं याची मला खात्री होती. कारण आमच्या घरचें दारिद्र्य सगळ्या गांवाला माहीत होतें. कुणीही आम्हांला उधार देत नसे. आमची पत खलास झाली होती. मग मीं धूर्तपणें विचार केला कीं, विठूनें चक्कींत दळण ओतीपर्यंत कांहीं बोलूं नये.

दळण ओतलें कीं हळूच म्हणावें, 'विट्ठू, पैसे मांडून ठेवायला सांगितलेत.' मग त्याचा नाइलाज होईल आणि आपलें काम होईल! हा विचार पक्का करून मी साळसुदासारखा उभा राहिलों. शेजारीं एक मस्त बाई उभी होती. तिच्या भरल्या अंगाचा उष्ण स्पर्श, लुगड्याचा खुसखुशीत गंध मला बरा वाटत होता! अर्थात् मांडीशीं लागलें आहे तरी हें नकळतें लहान मूल आहे अशा समजुतीनें ती बाई गप्प उभी होती. तिच्या मनांत काळेंबेरें नव्हतें. अखेर माझी पाळी आली. संशयपूर्ण नजरेनें माझ्याकडे बघत विठ्ठू आला आणि डब्यावर हात ठेवून मला म्हणाला,

"पैसे आणले आहेस का?"

त्याचा हा प्रश्न अनपेक्षित होता. तरी पण न डगमगतां मीं मान हलवली आणि ओरडून उत्तर दिलें (गिरणींत नेहमींच ओरडून बोलावें लागतें),

"नाहींत. मांडून ठेवायला सांगितलेत दादांनीं!"

त्यासरशीं डब्यावर एक थाप मारून तो म्हणाला,

"भीड भिकेची बहीण!"

आणि माझ्यानंतरचा डबा घेऊन गेलाही. शेजारची बाई फिदीफिदी हसली. दुःखपूर्ण अंतःकरणानें डबा उचलून मी घराकडे आलों.

आई वाटच बघत उभी होती. मी दिसतांच म्हणाली,

"किती रे उशीर? बारीक दळलंय् ना?" आणि तिला आढळून आलें कीं नेलेले जोंधळे तसेच परत आले आहेत!

"हें रे काय! जोंधळे तसेच आणलेस?"

मीं ठोकून दिलें,

"गिरणी बंद आहे!"

पण असल्या सबबी मोठीं माणसें ऐकून घेत नाहींत. आईनें माझा कान पकडला आणि स्वतःची मान कलती करून ती म्हणाली,

"ऐक!"

कान देऊन ऐकतांच मला कळून आलें कीं गिरणीचा आवाज ऐकूं येतो आहे. माझी अशी समजूत होती कीं गिरणी चालू कीं बंद हें समजण्यासाठीं तिथें जाऊनच बघायला हवें. आणि तें आई करणार नाहीं. (कारण मग तिनेंच नसतें का दळून आणलें?) आणि सहाजिकच तिचा माझ्या सांगण्यावर विश्वास

बसेल. पण कानाचा उपयोग करून घरबसल्या ही गोष्ट कळूं शकते हें आईनें मला पटविलें !

" आहे ना चालू गिरणी ? मग कां आणलं नाहींस दळून ? "

मी नव्या सबबी शोधूं लागलों. आईच्या मनांत एकाएकीं एक शंका आली.

" आणा कुठाय् मीं दिलेला ? "

" वाटेंत हरवला ! "

" चल, दाखव कुठं हरवलास तें ! "

गिरणीकडे जाणारा रस्ता अर्धा चालून जाईपर्यंत मीं तोंड उघडलें नाहीं. आई बारीक डोळ्यांनीं शोधीत होती. तिच्या नजरेंतून इंच इंच तपासला जात होता. पण न हरवलेला आणा सापडणार कसा ! शेवटीं मला तिची दया आली. थांबून म्हणालों,

" खरं सांगायचं म्हणजे आणा हरवलाच नाहीं ! "

" हात् मेल्या ! मग शोधायला कां लावलंस मला ? हरवला नाहींस तर काय केलास ? "

दुसरी एखादी चांगली सबब न सुचल्यामुळें मीं खरी गोष्ट सांगून टाकली.

" मी जुगार खेळलों. त्यांत आणा हरलों ! "

माझ्या उत्तरानें आई इतकी हतबुद्ध झाली कीं तिनं मुळींच हात उचलला नाहीं. दरदरा ओढीत वडिलांपुढं उभं करून ओरडा केला,

" वीतभर नाहीं तोंवर कार्टं जुगार खेळूं लागलं ! शर्थ झाली ग बाई याच्यापुढं ! "

नेहमींच्या शांतपणानें वडिलांनीं माझी कबुली घेतली,

" काय रे, जुगार खेळलास ? "

मीं मानेनें होकार दिला. कारण नकार देऊन तरी काय उपयोग ?

त्यासरशीं वडील म्हणाले,

" दौत, बोरू आणि एक कार्डबोर्ड घेऊन ये ! "

या जिनसा त्यांना कशासाठीं लागणार आहेत याचा बोध न झाल्यामुळें मी गोंधळलों. जुगार खेळण्याच्या भयंकर गुन्ह्याबद्दल मला कांहीं शिक्षा होत नाहीं हें ध्यानीं घेऊन आई लाटणं आणण्यासाठीं स्वयंपाकघरांत गेली. वडील शांतपणें पुन्हां म्हणाले,

“ जा ! दौत, लेखणी आणि कार्डबोर्ड घेऊन ये ! ”

मग मी हललों. तें साहित्य घेऊन आलों.

“ हें घ्या. ”

“ आणलंस ? ठीक. मांडी घालून बैस आणि लिही – ‘ हा मुलगा जुगार खेळला ’ ! ”

वळणदार अक्षरांत मीं हें वाक्य लिहिलें. मग वडिलांनीं भोकें पाडून तो बोर्ड माझ्या गळ्यांत अडकवला आणि बोटाला धरून मला सर्व गल्लींतून फिरविलें !

दुकानावरील पाटीप्रमाणें पोरेंटोरें माझ्या गळ्यांतील बोर्ड मोठमोठ्यानें वाचीत आणि तोंडाला हात लावून फिदीफिदी हसत. वरकरणीं मी त्यांच्यावर दांतओठ खात होतों, पण खरं तर मला मेल्याहून मेलें झालें होतें.

फिरतां फिरतां आम्ही मामलेदाराच्या घराशीं आलों आणि दारांत उभ्या राहिलेल्या सुलूनं ती पाटी वाचली. दुष्टपणानं हसून ती आंत पळाली.

आणि जुगारावरचा माझा विश्वास उडाला !



## दीर-भावजय

दुपारच्या वेळीं गंगू ओसरीवर बसली होती. एक गुडघा उभा करून आणि गालावर हाताचा मुटका टेकवून. समोरच्या अंगणांत तिनें सांडगे वाळत घातले होते. पांढऱ्या स्वच्छ धोतरावर उठून दिसणाऱ्या पिवळ्या सांडग्यांमुळें गावांतले कावळे चाळवले गेले होते. ते सारख्या घिरटया घालीत. दोन पायांवर उड्या घेत. सांडग्यापाशीं पोचत आणि वाकडया मानेनें गंगूकडे बघत. धिटाईनें बघत. मग गंगू चवताळून उठे आणि हातवारे करीत ओरडे,

"अरे, हाडया ... हाड्या ... ड्या ... !"

कावळे उडून जात आणि माळवदावर बसून अधाशीपणानें सांडग्यांकडे बघत. मग गंगूला जास्तच चीड येई आणि ती आपल्या थोरल्या दिराला शिव्या देई! 'सगळ्या गावांत त्यालाच इतका मान कां मिळावा? तो काय राजा आहे का प्रधान आहे? बघितला तर साधा कुलकर्णी. तोही थोरला म्हणून. माझा नवरा थोरला असता, तर त्यालाच मिळाली असती ही सगळी बडेजावी. पण माझें मेलीचें नशीब नको का? तितकें पुण्य नको का? थोरल्या दिराचा बडेजाव बघून कुढत बसणेंच माझ्या नशिबीं आहे. भावाच्या ओंजळींतून पाणी पिणाऱ्या यांच्या हातून काय होणार! त्याच्यापुढें 'हां जी हां जी' करतील. त्याचीं पोरें घेऊन गावभर हिंडतील. त्याच्या बायकोनें सांगितलेलीं कामें चाकरीच्या गड्यासारखीं निमूट करतील! शर्थ आहे ग बाई यांच्यापुढें!'

गंगूनें बसण्याची तऱ्हा बदलली. नाक मुरडलें व लांबलचक सुस्कारा सोडला. भिंतीपलीकडे तिची थोरली जाऊ मऊगूत गादीवर वामकुक्षी करीत होती.

तिचा तालेवार नवरा चावडीवर गेला होता. तिचीं गुटगुटीत आणि दिसायला चांगलीं असलेलीं मुलें घेऊन तिचा धाकटा दीर रानांत गेला होता.

आणि इकडे गंगू सांडग्यांवर नजर ठेवीत उगीच बसली होती. तिच्या अंगावर धड लुगडें होतें ; पण दिरानें दिलेलें. तोच तिचें घर चालवीत होता. मोठ्या घरांत मध्यें भिंत घालून घरें जरीं दोन झालीं होतीं, तरी अद्याप पुढचें अंगण समाइकांतच होतें. शेतीभातीही अद्याप वांटली नव्हती. सारा कारभार थोरला दीरच संभाळीत होता. आणि याच गोष्टीचें वैषम्य गंगूच्या मनाला जाळीत होतें ; तोडीत होतें.

गंगूचा नवरा अगदीं मवाळ होता. कमी बोलणारा. कमी हसणारा. कमी रागावणारा. आई मेलेल्या वासरासारखा तो नेहमीं दीनवाणा दिसे. त्याला गावांत मुळींच मान नव्हता. सरकारदरबारीं त्याची ओळख नव्हती. वजन नव्हतें. मोठ्या झाडाखालीं उगवलेल्या रोपाप्रमाणें तो खुरटला होता. त्याला स्वतंत्र असें जणूं अस्तित्वच नव्हतें. बाळाजी कुलकर्ण्याचा धाकटा भाऊ म्हणूनच त्याला आजूबाजूचे लोक ओळखीत होते. आणि त्या बिचाऱ्याला या अपमानास्पद गोष्टीची बिलकूल जाणीव नव्हती. ती जाणीव धूर्त, कावेबाज आणि कुजक्या मनाच्या गंगूला होती ! दिराची भरभराट बघून तिच्या अंगाचा तिळपापड होत होता. एखाद्या रोगानें तो रुबाबदार मिशांचा गोरापान माणूस उलथावा, सगळा कारभार आपल्या नवऱ्याकडे यावा, आणि चांगल्या साड्या, भरगच्च दागिने वापरणाऱ्या जाऊला आपण राबराब राबवावी, उपाशी ठेवावी, लाथाळावी, असें तिला सारखें वाटत होतें !

गंगू उठली आणि तरातरा परसदारीं गेली. मग तिच्या लक्षांत आलें कीं, कावळे सांडगे खातील. आणि पायांतलीं जोडवीं वाजवीत ती पुन्हा अंगणांत आली. दरम्यान एक कावळा सांडगा उचलून पळाला होता. हें ध्यानांत येतांच ती अंगणाच्या मध्यभागीं येऊन उभी राहिली आणि पडवींत दुपारची वामकुक्षी करीत असलेल्या जावेच्या दिशेनें हातवारे करीत ओरडली,

" अग कुजके ! समोर असून कावळा हाणला नाहींस ! डोळे फुटले होते, का वाचा बसली होती, का हातपाय मोडले होते ? "

सुखामुळें सुटलेली जाऊ या कडाक्यासरशीं जागी झाली आणि बावरल्या नजरेनें मागेंपुढें बघूं लागली. तशी गंगू पुन्हा गरजली,

" कावळा हाणला असतास तर तुझ्या जातीला कांहीं बट्टा लागला असता ? कांहीं तुझ्या रुपायाचे बारा आणे झाले नसते !"

जाऊ कांहीं वेळ गप् झाली व मग काय झालें असावें हें तिच्या ध्यानीं आलें. काकुळतीला येऊन ती बोलली,

" मीं नाहीं हो पाहिलं ! वाटकुळची माझी झोप लागली होती. मला ठाऊक सुद्धां नाहीं केव्हां कावळा आला तें !"

" हो हो, नसेल तर काय ! मला कळतात बरं या गोष्टी ! सगळं समजतं मला. पण नवऱ्याच्या मोठेपणानं नको इतकी मातून जाऊंस ! या दुनयेंत रावाचे रंक एका घडींत होतात !"

जावेला जावेचा स्वभाव ठाऊक होता. गंगूच्या तोंडाला लागण्यांत अर्थ नाहीं हें कळत होतें. पदर सावरून ती उठली आणि चूल भरण्यासाठीं मागील दारीं गेली. ती गेली तरी कमरेवर हात देऊन गंगू बोलतच राहिली. रागारागानें तिचा काळा चेहरा अमसुली रंगाचा झाला ! ओठांच्या कडेशीं थुंकी साचली. सांडग्याचें धोतर गोळा करून तिनें आपलें अंगण खराट्यानें खराखरा लोटलें ! आणि सारा केरकचरा, चिपाडें, शेण, दगडमाती जावेच्या अंगणांत लोटलीं. जोत्याच्या कडेशीं बसून डुलकी घेणाऱ्या तिच्या कुत्र्याला धोंडे मारून बाहेर पळवलें. तिच्या पोरांनीं खेळतां खेळतां अंगणांत आणून टाकलेलें उलथनें हुषारीनं उचलून आपल्या घरांत आणून ठेवलें !

दरम्यान पलीकडे वरच्या आळीची मिरा बसायला आली होती. तिच्याशीं बोलतां बोलतां थोरली जाऊ चहा करीत होती. चुलीचा धूर भिंतीवरून अलीकडे येत होता. तें ध्यानांत येतांच, गंगू भिंतीला कान देऊन तें बोलणें ऐकूं लागली !

जाऊ हलक्या शब्दांत सांगत होती,

" वीट वीट आलाय् बघा मला ! यापेक्षां सरळ विभक्त व्हावं. अहो, कांहींतरी कारण काढायचं आणि वाईटवकटं बोलायचं. त्याला कुणीं तोंड द्यावं ? आणि ..." इथें तिचा आवाज आणखी खालीं आला. " उचली तर एक नंबरची आहे ! पोराबाळांनीं एखादं भांडंकुंडं बाहेर टाकलं कीं चट्कन् ओच्यांत घालून घरांत नेऊन ठेवती आपल्या !"

हें ऐकलें आणि गंगू रागानें वेडी झाली ! पडलेल्या खरकट्यावरून सरासरा

शेणगोळा फिरवून तिनें तो जाऊच्या परसदाराकडे भिरकाविला. बोटें मोडलीं. शाप दिला, "वाटोळं ग होईल! अन्नान्नदशा होईल! भिकेला लागाल!" तरीही तिचें समाधान झालें नाहीं. दिराचा पाणउतारा केल्याशिवाय तिच्या मनाला समाधान वाटणार नव्हतें. त्यानें चावडीवर कां बसावें? साऱ्या लोकांनीं त्याला कां मान द्यावा? त्याची थुंकी कां झेलावी? असा कोण तो बाजीराव लागून गेलाय्? आं? कोण नाहीं तो! त्याला कुणी विचारूं नका! कुण्णी रामराम घालूं नका! अरे, सगळे मिळून लाथेनें चेचा त्याला!

संतापाच्या भरांत गंगूनें दांतओंठ खाल्ले. मुठी वळल्या. कोपऱ्यांत जाऊन ती बदकन् खालीं बसली तेव्हां मागच्या भिंतींतून वर आलेला दगड तिच्या पाठीला लागून सणसणीत कळ आली. पाठीवर हात देऊन, पुढें वाकून, तिनें डोळे मिटले आणि ती कळ निमूट सोसली. ओठावर ओंठ दाबून सोसली आणि मग तिनें धुण्याचा एक भला मोठा बोजा तयार केला. फाटकीं तुटकीं घोंगडीं, पासोड्या, चिंध्यापांध्या सारें धुवायला काढलें. अंगावरचें लुगडें सोडून एक आखूड फडकें (जुनेरें) लावून घेतलें. आणि तो बोजा डोईवर घेऊन तसल्या वेषांत ती बाहेर पडली!

बाळाजी बाजीराव चावडींत पालथी मांडी घालून बसला होता. तीस-पस्तीस वयाचा. भक्कम शरिराचा. घोसदार मिशांचा. भल्याभल्यांना उडवून लावणारा. वाघ-शेळीला एका जागीं पाणी पाजणारा! त्याच्या डोईवर जरीकाठी रुमाल होता. अंगांत बाराबंदी होती. खालीं करवतकाठी धोतर होतें. पालथ्या मांडीवर ठेवलेल्या बुकांत तो वळणदार अक्षरात कामकाज लिहीत होता. वरचेवर ठोकळ्यांतली मऊ वाळू ओल्या अक्षरांवर टाकीत होता.

धुण्याचा बोजा डोक्यावर घेतलेली, 'आडवें' लावलेली गंगू आडवळणानें विहिरीवर जाण्याचें सोडून थेट चावडीवरून गेली! चावडींत चार प्रतिष्ठित मंडळी आणि दीर होता, तरी असल्या वेषांत तरतरा निघून गेली! आणि हें बाळाजीनें पाहिलें. त्याच्या उग्र चेहऱ्यावरचे स्नायू हालले. घाऱ्या डोळ्यांत रागाची लहर आली. पण किती? कळत नकळत! आणि मग पुन्हां तो खालीं मान घालून कामकाज लिहूं लागला. चावडींतील इतर मंडळी थोडीबहुत दबकली. शरमली. कुलकर्ण्याच्या भावजयीनें चावडीपुढून अशा वेषांत जावें म्हणजे काय! आतां बाळाजी घरीं जाऊन कसा गोंधळ घालील!

गंगू झपाझपा विहिरीवर गेली. मोट चालू होती. वाफ्यांत उतरून तिनें धबाधबा धुणें बडवलें. खसाखसा चोळलें, पिळलें. आणि ओला झाल्यामुळें अधिक जड लागणारा तो बोजा वागवीत ती पुन्हा आली. चावडीसमोरून तरातरा गेली! जागोजाग अंग भिजलेलें. हातापायाची कातडी गारठून सुरकुतलेली. धीटपणें गंगू चावडीसमोरून परत गेली. आणि याही खेपेला बाळाजीनें तिला पाहिली. आपल्या भावाची बायको एखाद्या मुरळीसारखी चावडीसमोरून, पदर न घेतां, न लाजतां सवरतां गेली, हें बाळाजीनें नीट बघितलें!

संध्याकाळ झाली. भावाचीं मुलें कटीखांद्यावर घेऊन लखोबा घरीं आला. वहिनीपाशीं पोरें सोडून आपल्या घराच्या ओसरीवर येऊन बसला. धुळीनें भरलेले पाय झाडीत म्हणाला,

“अग, मला थोडं पाणी देतीस का?”

घरांत दिवे लागले होते. पलीकडे कंदील होते. गंगूच्या घरीं समई होती. तीही स्वयंपाकघराच्या मध्यभागीं. मंद प्रकाश होता. भानवटीला टांगलेल्या शिंक्यांत ज्वारीच्या भाकरी होत्या. त्यांचा खमंग वास मातीनें सारवलेल्या भिंतीच्या वासाला मारीत होता. समईपाशीं तळहातावर वाती करीत गंगू बसली होती. नवऱ्याचें बोलणें तिनें ऐकलें न ऐकलेंसें केलें.

इतक्यांत अंगणांत जोडा वाजला. खूप मोठ्यानें खाकरणें ऐकूं आलें. आणि त्यापाठोपाठ गर्जना झाली,

“लख्याऽ!”

ओसरीवर बसलेला लखोबा खालीं मान घालून समोर गेला. केवळ हाकेच्या धारेनें त्यानें प्रसंग जाणला. पोरें घाबरून आईला बिलगलीं. त्यांना पोटाशीं धरून थोरल्या जाऊबाई परसदारीं जाऊन उभ्या राहिल्या. त्यांना हें बोलणें ऐकवलें नसतें. गंगू मात्र स्वयंपाकघराबाहेर येऊन भिंतीच्या आडोशाला उभी राहिली.

आणि मग फटाक्यांचा सर उडावा तसे शब्द झडले,—

“लेको! यापरीस बायका नेऊन विहिरींत कां ढकलाना? डोक्यांत धोंडा घालून माराना कां? वर्षाचीं दोन लुगडीं आणि चोळी यांचा तरी खर्च वांचेल! चांगल्या ब्राह्मणाच्या कुळांत जन्माला आलां म्हणावं, आणि ही मुरळ्यांची

वागणूक कुठून उचलली ? मला हें असं खपणार नाहीं ! मला असलं बघण्याची संवय नाहीं ! काय ?"...

लखोबानें खालीं घातलेली मान वर केली नाहीं. भावासमोर कांहीं बोलण्याचा धीर त्याला नव्हताच. तो आपला मुकाट ऐकून घेत होता. भावाच्या बोलण्यानें भिऊन 'गट्गोळा' झाला होता.

..."अंगावर सुडकं नाहीं धड, आणि थेट चावडीसमोरनं गेली गाढवी ! मी बसलोंय्. चार मंडळी बसलीत. काय लाज-अब्रू ? जनाची नाहीं, मनाची तरी ! काय, डोकंबिकं फिरलंय काय ?"...

काय प्रकार झाला असावा हें हळूहळू लखोबाच्या ध्यानीं येऊं लागलें होतें. भिंतीच्या आडोशाला उभी राहिलेली गंगू हें ऐकून घेत होती. तिच्या नाकपुड्या फुगून हालत होत्या. ओठ थरथरत होते. दिराचा आवाज खूप चढला होता. परसदाराशीं उभ्या राहिलेल्या थोरल्या जाऊबाईंनासुद्धां त्यांतील शब्द स्पष्ट ऐकूं येत होते.

..."का दारूबिरू घेती अलीकडे ?... आं ? होय रे, ए शुंभा ? तोंड आहे का बोलायला ?"...

भावाच्या संतापानें, बोलण्यानें लखोबाचा गळा दाटला होता. त्याच्या डोळ्यांत पाणी उभें राहिलें होतें.

..."मूर्ख ! गाढव आहे तुझी बायको ! तिला लाथा घाल ! कुत्रीं बडवल्या-सारखी बडव एकवार ! बाकी तुझ्या हातून काय होणार ! पण तिनं आज माझा पाणउतारा केला ! बाळाजीची भावजय चावडीपुढून अशा वेषांत गेली हें सगळ्या गावांत झालं असेल. अशी बाई घरांत राहण्यापेक्षां मेलेली बरी ! कांहीं तिच्यावांचून अडणार नाहीं. हां !"

जवळ जवळ तब्बल एक तास बाळाजी बोलत होता. फाडफाड बोलत होता. त्याला माहीत होतें कीं, हें बोलणें गंगू ऐकते आहे. पण त्यासाठींच तर तो बोलत होता. आणि चिंचेच्या ओल्या फोका ओढाव्यात तसे शब्द ओढीत होता. त्या प्रत्येक फटकाऱ्यानें गंगू विव्हळ होत होती. तिला हा मार नवा होता. विलक्षण होता. लग्न होऊन आठ वर्षें झालीं होतीं, पण दीर कधीं असा बोलला नव्हता ! कधीं असा संतापला नव्हता ! असलें बोलणें गंगूनें बापजन्मीं ऐकलें नव्हतें !

मग थोरल्या जाऊबाईनीं धीर दिला. चौकटीच्या आंतच उभ्या राहून त्या हलक्या आवाजांत म्हणाल्या,

" पाय धुवायला काढलेलं पाणी निवून चाललंय्. "

त्यासरशीं ही सरबत्ती थांबली. रुमाल खुंटीला अडकवून बाळाजीनं पाय धुतले आणि संध्येसाठीं तयारी केली.

लखोबाला घरीं जाववलें नाहीं. मान खालीं घालून आणि खांदे पाडून तो थेट गावाशेजारच्या मळ्यांत गेला आणि अंधारांतच बैलाला गोंजारीत बसला.

बाळाजीचें जेवण आटपलें. पान खाऊन तो उठला आणि सोंगट्या खेळण्यासाठीं दौलुबापूच्या वाड्यावर गेला. थोरल्या जाऊबाईचीं पोरें झोपेला येऊन थोडा वेळ रडलीं. त्यांना गाणें म्हणत, थोपटीत त्या बसल्या. पोरें झोपलीं तशा उष्टींखरकटीं आवरूं लागल्या. पण पलीकडे कांहीं हालचाल त्यांना दिसली नाहीं. दिवाही दिसला नाहीं. दीर-जाऊ जेवलीं किंवा नाहीं ? घरांत अद्याप दिवासुद्धां कसा लागला नाहीं ? या विचारानें मनांत गोंधळ झाला तेव्हां ओला हात पदराला पुशीत त्या बाहेर आल्या आणि हलकेच गंगूच्या ओसरीवर गेल्या. अंधारांत उभ्या राहून त्यांनीं हाका मारल्या,

" गंगू ! गंगू ! भावजी ! "

एक नाहीं दोन नाहीं. तेव्हा कंदील घेऊन त्यांनीं बघितलें, तर दार बंद होतें. कुलूप ठोकलें होतें आणि दोघेंही नवराबायको कुठें निघून गेलीं होतीं. दोघें कुठें गेलीं ? कदाचित् भावजी रागेजून निघून गेले असतील आणि त्यांना शोधायला म्हणून गंगू बाहेर पडली असेल ? कांहीं कां असेना, थोडी वाट बघावी. अद्याप कांहीं जेवणवेळ टळलेली नाहीं. मग जाऊबाई आपल्या घरीं गेल्या आणि मुलांच्या शेजारीं सहज आडव्या झाल्या.

लखोबा जनावराशेजारीं बसबस बसला. रानांतला वारा भरारून सुटला. सगळीकडे भकास वाटूं लागलें. वेळ गेला त्यामुळें रागाची आचही निवली आणि मग हळूहळू तो घरीं आला.

घरांत अंधार होता. 'ही न जेवतांच झोपली काय ?' त्यानें अंधारांतच दारावर हात ठेवला, तों कुलूप ! म्हणजे ? कुलूप लावून ही अशा वेळीं कुठें गेली ? घर सोडून कधींही न जाणारी गंगू कुलूप लावून कुठें गेली ? ... कशी गेली ? कधीं गेली ?

" वहिनी, वहिनी ! "

मुलाशेजारीं आडव्या झालेल्या वहिनींचा डोळा कधींच लागला होता. त्या दिराच्या हाकेनें खडबडून उठल्या.

" कुलूप लावून कुठं गेलां होतां भावजी ? "

" मीं कुलूप लावलं नाहीं; मी घरांतही गेलों नाहीं. परस्परच मळ्यांत गेलों होतों तो आतां माघारीं आलों. ही कुठाय् ? "

" मीही तेंच म्हणतें ! दिवेलागणी झाली तसा तिकडे काळोख आहे; दाराला कुलूप आहे. मग ही गेली कुठं ? "

" वरच्या आळीला तर गेली नसेल बसायला ? "

" कशी जाईल ? रात्रीं-अपरात्रीं ? तरी पण संशय नको. बघून या. "

लखोबा तरातरा वरच्या आळीला गेला.

" आत्याबाई ! ... आत्याबाई, झोपलां का ? "

" कोण आहे ? "

" मी लखोबा. "

" कां रे बाबा, ... अशा अपरात्रीं ? "

" आमची ही आली आहे का ? "

" कोण ? गंगू ? नाहीं रे माझ्या लेकरा. कां रे ? "

" दिवेलागणीपासून कुठं गेली आहे ती अद्याप आली नाहीं ! "

" आं ! अरे मग नीट चौकशी कर. "

घाबऱ्या घाबऱ्या लखोबा घरीं आला. दरम्यान सोंगट्या खेळून बाळाजी माघारीं आले होते. बाराबंदी काढून झोंपायच्या तयारींत होते. गंगूचा प्रकार कानांवर आला होताच. लखोबा येतांच त्यांनीं विचारलें,

" का रे, कांहीं पत्ता ? "

" नाहीं. "

" ठीक. घरामागं जाऊन सोनारबाबांना घेऊन ये. म्हणावं, कुलूप तोडायचं आहे ! "

बाळाजींचें काम म्हटल्यावर म्हातारा सोनार तशा रात्रीं हत्यारेंपात्यारें घेऊन आला. कंदिलाच्या प्रकाशांत त्यानें मिनिटें दोन मिनिटें कुलपाशीं खटपट केली व तें पुन्हा उपयोगांत यावें अशा तऱ्हेनें काढलें.

अर्थातच आंत कुणी नव्हतें. चूल थंडगार होती.

गंगू गेली कुठें ? आतां मात्र प्रसंगानें गंभीर रूप घेतलें !

पायांत जोडा घालून बाळाजी तरातरा बाहेर पडले; रामोशवाड्यांत गेले आणि त्यांनीं हाकाहाक केली. हातांत काठ्या घेऊन रामोशी बाहेर आले,

" काय हुकूम, सरकार ? "

" आमची जाऊ कुठं चुकलीय्. चारी दिशांनीं चारजण जा. शोध करा. अंबाजी, तूं गावांत बघ ! "

रामोशी बाहेर पडले. चारी दिशांनीं शोध घेऊं लागले. विहिरी-तळींसुद्धा शोधूं लागले. न जाणो, बामणाच्या जावेनें जीव दिला असला तर ?

गावांतहि शोध सुरू झाला. पांच-पंचवीस कंदील अंधारांतून फिरूं लागले. हा प्रकार रात्रीं चार वाजेपर्यंत चालला; पण कुठेंही पत्ता लागला नाहीं !

सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. बाळाजी एवढा धीराचा माणूस, पण त्याच्याहि मनाला रुखरुख लागली. पोरीनें जिवाचें बरेंवाईट करून घेतलें नाहीं ना ?

कंदिलांतील तेल संपलें; तो तटतटूं लागला तेव्हा अंबाजी घराकडे परतला. अंधारांतून वाट काढीत वाड्याच्या मागच्या बाजूनें आंत येऊं लागला. तो खाकरला खोकला आणि स्वतःशींच मोठ्यानें बोलला,

" तेल खलास झालं. तें भरून घेऊन पुन्हा हिंडलं पाहिजे. पर आतां उजाडायला आलं ! "

तो असें बोलला तोंच कुठूनसा आवाज आला,

" अंबाजी, मी इथं आहें ! "

दचकून अंबाजी उभा राहिला. कानांवर हात धरून म्हणाला,

" कोण तें ? ... कोण हाय ? "

पुन्हा खोल आवाज आला,

" मी गंगू, इथं आडांत आहें ! "

भिंतीशेजारीं असलेल्या आडाकाठीं जाऊन, आंत डोकावून बघत, अंबाजीनें खात्री करून घेतली.

" तुमी हाय आंत बाई ? "

" हो रे, मी आंत आहें ! "

डोळ्यांवर हात देऊन अंबाजीनें आंत पाहिलें; पण त्या खोल आडांत गडद अंधार होता.

" मी थंडीनं मरायला लागलेंय्! अंबाजी, मला वर काढ!"

मग अंबाजीनें जलदी केली. कंदील आणला. पाणी काढायच्या दोराचा मोठा फास तयार केला. कंदील आंत धरून तो फास त्यानें आंत सोडला.

" बाई, घाबरूं नका. कमरेला फास लावा; मी वर ओढून घेतों!"

दोर सोडतांच आडांतले डास मधमाशा उठाव्या तसे उठले. त्यांतून सरसरत दोर आंत गेला आणि पाण्यांत सप्कन् पडला. जेमतेम चार हात रुंद असलेल्या आडाच्या 'रापा' वर भिजून चिंब झालेली गंगू बसून राहिली होती. जीव देण्यासाठीं उडी घेतांना आडाच्या बाजूला खरचटून तिच्या अंगाचीं जागजागीं सालडीं निघालीं होतीं. वरून अंबाजी ओरडला,

" बाई, भिऊं नका. फांस बळकट घ्या आणि दोर गच्च धरा. मी तुम्हाला अल्लद वर घेतों!"

मग गंगूनें कमरेला फास घेतला. हातांनीं दोर गच्च धरला.

" अंबाजी, ओढ."

अंबाजीनें बळकट दोर ओढला. पाणी घाण न होण्यासाठीं आडांत पडलेली घूस शेंदून काढावी तशी त्यानें गंगूला शेंदून काढली.

गंगू वर आली.

दरम्यान हातांत कंदील घेऊन बाळाजी तिथें येऊन दाखल झाले. कांहींएक न बोलतां, कंदील वर करून त्यांनीं भावजयीचें अंग पाहिलें.

जागजागीं रक्त आलें होतें. उकडलेलें रताळें सोलल्यासारखी गंगू जागजागीं सोलली होती. तें बघून बाळाजी चुकचुकले, गंभीरपणानें म्हणाले,

" छे, भलतंच खरचटलंय पोरीच्या अंगाला! कुणीं कारागिरानं हा आड इतका अरुंद केला देव जाणे! अंबाजी, उद्या चार गडी बोलावून हा आड बुजवून घे आणि दुसरा चांगला रुंद आड पाड! जा पोरी आंत. ओलं सोड!"



# भानाचं भूत

गांवओढ्याच्या पलीकडे भाना भाडुळ्याचा मळा होता. सलग नऊ एकराचा काळाकरंद मळा. हत्तीच्या मस्तकासारखा डाग. माणूस पेरलं तरी उगवावं. अशा मळ्यांत भाडुळ्याचं घरबार खपे. गुरढोर राबे. त्या राबणुकीखपणुकीच्या बदल्यांत त्यांना सोनं मिळे; धामाच्या थेंबागणीक मोत्याचं कणीस पदरांत पडे. त्यामुळं म्हातारा बाबा भाडुळे सुखी होता. संध्याकाळच्या वेळीं टाळ घेऊन 'रूप पाहतां लोचनीं। सुख झालें हो साजणी।' असा गजर करीत बसण्या-इतपत फुरसत त्याला मिळत असे. थोरल्या पोराच्या कर्तुकीनं मनीं थंड्याजलेली बायजा भाडुळीण डागडागीणं लेवून चार दिवस लेकीच्या गांवीं जाऊन राहात असे. वयांत आलेला दाजी भाडुळे खारीक खोबरं खाऊन कुस्त्या मारीत असे. उरूस, जत्रा फिरत असे. कारण त्याच्या चार दिवसाच्या गैरहजेरीनं कामांत थट पडत नाहीं, भानादादा सर्व बघतो, हें त्याला ठाऊक असे.

अशा या धबडग्यांत भानाला मात्र फारसं बनत नसे. त्याचा सगळा वेळ मळ्यांत जाई. भाकरीतुकडा खाण्यासाठीं गांवांतल्या घरीं येण्याइतपत सवडदेखील त्याला मिळत नसे. भुकेच्या वेळीं कोणीतरी जेवण पोंचवावं लागे. बाकीची मंडळी सकाळीं न्याहरी करून रानांत येत, दिवसभर उस्तवारी करीत आणि दिवस मावळायला पुन्हा घराकडे परतत. पण भानाला गुरांना वैरण काढायची असे. पिकांची राखण बघायची असे. कुणीं चार ऊस मोडले, कुणीं कोवळ्या काकड्या पळवल्या, कुणीं भाराभर मका काढून नेला, असं होऊं नये म्हणून रात्रीं अपरात्रीं त्याला रानांत राहावं लागे. सोबतीला त्याचीं सुलक्षणी गुरंढोरं आणि इमानी कुत्रं असे. या सगळ्यांच्या जागत्या पहाऱ्यामुळं

चोराचिलटांना नेहमींच मोठा धाक होता. मळ्यांतली तन्‌सडीही इकडची तिकडे होत नसे.

कडुसं मावळलं होतं. आभाळांत चांदण्या फुलू लागल्या होत्या. समोरचा उसाचा फड काळाशार होऊन एखाद्या भिंतीसारखा दिसत होता. दावणीशीं रवंथ करणारीं पांढरीं फेक बैलं नजरेला दिसेनाशीं झालीं होतीं. नाना पिकांचा वास बरोबर घेऊन गार वारा सुटला होता. चहूंकडे गडीगुप्प होतं आणि घरून येणाऱ्या भाकरीची वाट बघत भाना उगीच बसला होता. वैरणीच्या पेंढ्या लावून केलेल्या खोपींत बसला होता. आणि तलफेखातर विडी ओढत होता. विडीचं लाल टोंक नागाच्या फडींतील मण्यासारखं चमकत होतं आणि विझत होतं.

तल्लीन होऊन भाना विडी ओढत असतांनाच कुणाचीशी चाहूल आली. सावधगिरीनं कान टवकारून भानानं शब्द सोडला,

"कोण आहे?"

त्या पाठोपाठ अनोळखी आवाजांत लगोलग जबाब आला,

"मी वाटसरू आहें."

"वाटसरू? मग इकडं कुणीकडं?"

"चुकून आलों, बेटा."

"कोण गांवचे? जाणार कुठं?"

"गोसाव्याला कसलं नांवगांव विचारतोस! मागून खातों अन् धर्मशाळेंत झोंपतों."

गोसावी म्हणतांच भाना थोडका हलला. पायघोळ कफनी घालून भिक्षा मागत हिंडणारे हे जटाधारी गोसावी मोठे कोपिष्ट असतात, सामान्य माणसांना त्रास पोंचेल अशा रीतीच्या कांहीं विद्याही त्यांच्यापाशीं असतात, या समजुतीनं नरमला.

आणि मग भीतीच्या पोटीं आदर आला, आगत-स्वागत आलं. छाटणीच्या खिशांतून दुसरी विडी काढून ती पुढें करीत भाना बोलला,

"बसा कीं. घ्या विडी."

वाटचाल करून थकलेला गोसावी वांकून खोपींत आला आणि विव्हळत खालीं टेकला. खांद्यावरची झोळी आणि हातांतला कमंडलू ठेवून नीट बसला.

विडी ओढायला मात्र त्यानं नकार दिला, "आम्हां लोकांची तलफ बिडीनं भागत नाहीं, बेटा. हिरवी तमाखू लागते."

आणि मग सारा सरंजाम काढून तो गांजा मळूंही लागला. मळतां मळतां पुन्हां चार वाक्यांची देवाणघेवाण झाली.

"असं कुठं पोंचायचं बुवा ?"

"काशी-विश्वेश्वरला जाण्याच्या इरादानं निघालोंय !"

"मागं घरदार, पोरंबाळं कांहीं ?"

"कांहीं नाहीं. एकटा जीव सदाशिव !"

यावर कुणी कांहीं बोललं नाहीं. बुवा आपल्या नादांत लागला. भानाची विडी संपली. अद्यापपर्यंत भाकरी आल्या नाहींत तेव्हां दोन ऊस मोडावे, एकादं कांडं बुवाला द्यावं, एखादं आपण खावं, अशा हिशेबानं तो उठला. बुवाला म्हणाला, "बसा. आलों इतक्यांत." आणि फडाच्या दिशेनं चालला. मोठ्या झालेल्या बाहुल्यास थोडं थोडं दिसत होतं. फडापाशीं उभं राहून इकडे तिकडे बघतांच दोन फर्लांग अंतरावर असलेल्या शंकरच्या मळ्यांत उजेड दिसला. वस्तीवर जर शंकर असेल तर त्याच्या भाकरींतली थोडी खाऊं, पान खाऊं, असा कांहींसा विचार उगीचच मनांत आला आणि ऊस मोडायचं सोडून भाना तिकडे वळला. बांधाबांधांवरून चालत शंकरपाशीं पोंचला. खोपींत शंकर होता. उजेडांत बसून भाकरी खात होता. भानाला बघतांच तो म्हणाला,

"ये, भाकरी खाल्लीस का ?"

"न्हाई. घराकडनं कुणी आलंच नाहीं अजून !"

"मग हयगय कां ? खा ह्यांतली."

बांधाला बांध लागल्यामुळं संकोच नव्हताच. हातांत भाकरी घेऊन भाना बसला आणि ओल्या कांद्याबरोबर लचके मारूं लागला.

एकदीड भाकरीनं पोटाला थोडासा आधार करून पान चघळीत भाना परत फिरला आणि गोसाव्याची आठवण होऊन खोपीपाशीं आला. तेव्हां त्याचं काळीज लक्कन् हललं. सगळी खोप जळून राख झाली होती आणि इंगळाच्या तांबड्या उजेडांत जळून कोळसा झालेला गोसावी दिसत होता. हें असं कसं झालं ? हें अभद्र घडलं तरी कसं ? भयचकित होऊन भानानं आजूबाजूला बघितलं. त्याच्याशिवाय त्या आक्रीताला साक्षीदार असं दुसरं कोणी नव्हतं.

काळोखानं माखलेलीं झाडंझुडपं तटस्थ उभीं होतीं. मुकीं जनावरं भरल्या पोटीं पेंगत होतीं. वाळल्या पाचोळ्याची खोप कापराच्या वडीसारखी केव्हां जळली आणि आंत गांजा ओढीत बसलेला गोसावी कसा कोळसा झाला, याची दखल कुणालाच नव्हती. पण पुढं काय? पुढं पंचनामा आला, पोलीस आले, कोर्ट आलं, कचेऱ्या आल्या...

समजा, पैसे लुबाडण्यासाठीं मींच याला जाळून मारलं नाहीं कशावरून? ह खून मींच केला नाहीं कशावरून? आणि त्या गुन्ह्यापायीं फांशीची शिक्षा मला कां होऊं नये? सरकारनं पकडून मला फांसावर कां देऊं नये? ...

— मग माझीं बायकोपोरं, माझा मळा, माझीं गुरंढोरं? परमेश्वरा, ही काय आफत माझ्यावर आणलीस? या संकटांतून मी आतां कसा सुटूं? हा गुंता आतां कसा सोडवूं?

भानाच्या जिवाची उलघाल झाली. तडफडाट झाला. अगोदरच पापभीरू, भोळा असलेला भाना या भयंकर संकटानं अति भ्याला. आणि तो गोसावी, ती जळून राख झालेली खोप, ते विझते इंगळ – सगळं तिथंच सोडून तो धूम पळाला. उसाच्या फडांत जाऊन छपून बसला. भ्यालेल्या मेकरासारखा धांपा टाकूं लागला. असं छपून बसलं म्हणजे आपल्यावरची सगळी अदावत जाईल, आपण निर्दोष सुटूं, अशी त्याची समजूत होती. अरे, काय म्हणावं तुझ्या या वाळबुद्धीला?

तास अर्धा तास गेला आणि बाजरीच्या भाकरीची शिदोरी घेऊन भानाचा धाकला भाऊ खोपीपाशीं आला. राखेचा ढीग डोळ्यांना दिसतांच आणि करपट वास नाकांत येतांच तो ठो ठो बोंबलला शिदोरी तशीच घेऊन घरीं पळाला आणि रडत रडत बापाला म्हणाला,

" बाबा, खोपीला आग लागली — भाना जळून मेला!"

" आँ? काय म्हणालास? पोरा, काय म्हणालास?"

" मी बघून आलों. खोपीची जळून राख झालीया आन् दादा कोळसा होऊन पडलाया!"

" अरं पांडुरंगा —"

म्हाताऱ्याच्या पायांतलं वारंच गेलं. तो मटकन् खालीं बसला. त्यासरशीं बाकी सर्वांनीं रडण्याचा एकच गलगा केला. भानाची आई, बायको आणि लहान पोरं

गुरासारखीं ओरडूं लागलीं. तो ओरडा ऐकून गांवांतले चार लोक जमा झाले. हां हां म्हणतां भाना जळून मेल्याची बातमी सगळ्या गांवांत समजली. पाटील-कुळकर्णी आले. सगळे जण मिळून मळ्यांत गेले. लोकांनीं भानाच्या नातेवाईकांची समजूत घातली. पाटील-कुळकर्ण्यांनीं मयताचा पंचनामा केला. मध्यरात्रीपर्यंत हा गोंधळ चालला होता. आणि उसाच्या फडांत शिरलेला भाना काळजाचे ठोके ऐकत बसला होता. तो बाहेर पडला नाहीं.

दोन चार रोज गेले. या प्रकाराची आठवण विरूं लागली. भाडुळ्याच्या घरांतल्या दु:खाची आंचही थंडावूं लागली. कर्ता मुलगा गेला, आतां सगळी जबाबदारी दाजीवर पडली, याची जाणीव म्हाताऱ्यानं त्याला करून दिली. भानाची सर दाजीला नव्हती. इतका व्याप त्याच्यानं करवणार नव्हता. म्हणून असं ठरलं कीं, इतके एकर पडीक ठेवायचे आणि इतकेच करायचे. त्या दिशेनं भाडुळ्याचं घर कामाला लागलं. आतां मळ्यावर असलेला दिवसरात्र पहारा ढिलावला. चोराचिलटांना फावलं. भाडुळ्याचा ऊस, काकडी, मिरच्या यांची चव घ्यायला मिळणार यामुळं गांवांतलीं ओढाळ माणसं मनीं सुखावलीं.

अशाच एका चांदण्या रात्रीं चार पोरं गांवांतून उठलीं आणि दाजी घरींच आहे हें हेरून एकमेकांना बोललीं —

" चला रं, भाडुळ्याचा ऊस मोडूं. "

" नको बाबा, तिथं राखण असती. "

" अरं आतां कुठली राखण? भान्या मेला जळून ! "

" बघ बरं का – कांहीं बिलामत आली तर ! "

" मी जोखमदार ! चला. "

आणि भुभुकार करीत ती वानरसेना भाडुळाच्या मळ्याकडे आली. चांदण्याच्या प्रकाशांत सगळा मळा चित्रासारखा शांत होता. माणसाची सावट मुळींच नव्हती. तरी पण दबत दबत पोरं पुढं आलीं आणि धांदलीनं उसाच्या फडांत शिरलीं. कडाकड आवाज होऊं लागले.

बांधाला उसं देऊन झोंपलेला भाना जागा झाला आणि त्यानं नीट निरखून बघितलं, तर गांवचीं पोरं ऊस मोडताहेत. बाहेर येऊन तो पोरांसमोर उभा राहिला, ओरडला,—

" काय रं चोरानूं ! टाकतां का नाहीं ते ऊस ? का दावूं ? "

आणि सापडलेल्या पोराच्या मुस्काटांत त्यानं लगावलीही.

तो आवाज ऐकला, ती व्यक्ति बघितली, आणि भानाच्या परिचयाचीं पोरं भीतीनं ओरडलीं. अशीं ओरडलीं कीं, ऐकणाऱ्याच्या काळजांत तें ओरडणं टरबुजांत शिरणाऱ्या सुरीसारखं शिरावं. कुणाची बोबडी वळली तर कुणाचे पाय भेंडाळले. हातांतले ऊस टाकून त्यांनीं कसंबसं गांव गाठलं आणि बोंब ठोकली !

लोकांनीं चौकशी केली,—

" अरं काय, काय गडबड ? "

" भूत, भूत — भानाचं भूत दिसलं आम्हांला ! "

" आं ? "

" अन्नाच्यान् ! उसाच्या फडांतनं उठून त्या न्हाव्याच्या हरीला मुस्काटांत दिली ! "

मंडळी तिकडे पळाली. आणि न्हाव्याच्या पोराकडून त्यांनीं हकीगत ऐकली. तापानं फणफणत त्यानं ती सांगितली. गांवांत गलगा झाला. " भाडुळ्याचा भाना भूत होऊन मळ्याची राखण करतोय ! "

मग जसजसे दिवस जाऊं लागले तसतशा अधिक गोष्टी गांवांत पसरूं लागल्या. कोणाला रात्रीं भाना दिसला. कोणाला तो ओढ्यावर आंघोळ करतांना आढळला. कुणाशीं तरी त्यानं खायला भाकरी मागितली. खरं खोटं राम जाणे, पण अशा बातम्या गावांत उठल्या तसा भाडुळ्याचा मळा ओस पडला. भ्यादिवसासुद्धां माणूसकाणूस तिकडे फिरकेनासं झालं. मळ्याची उस्तवारी करणारा दाजीदेखील मनांत शंका धरून राहिला. रात्रीं अपरात्रीं मळ्यांत ठरेनासा झाला.

एक वार शंकरच्या मळ्यांत डावलोटीचं कीं कसलं जेवण होतं. बरंच पान उठणार होतं. दिवसभर जेवण उकडण्याचा सपाटा रानांत चालला होता. रात्रीं बत्तीच्या प्रकाशांत पंगत बसण्याची धामधूम चालली. बकऱ्याच्या कोरड्यासाचा वास उसाच्या फडांत बसलेल्या भानाच्या नाकापर्यंत गेला. त्याची भूक उसळली तोंडाला पाणी सुटलं. लोक ताटावर बसले. ग्यानबा-तुकारामाचा घोष झाला आणि आतां भाकरीचा तुकडा मोडून तांबड्या रश्श्याचा भुरका मारणार तोंच आवाज आला,

" अरं शंकर, मर्दा, मला बोलवायाचं नाहीं ? "

माना वर करून लोकांनीं जेव्हां बघितलं तेव्हां भाडुळ्या भाना सादमूद त्यांच्यासमोर उभा दिसला. मग कसलं जेवण नि कसलं मटन ! घरून आणलेलीं पितळ्या-तांब्यादेखील तिथं टाकून लोक पळाले. धूम गांवाकडे पळाले. भाना भाडुळ्याचं भूत दिसल्यामुळं त्यांना पळतां भुई थोडी झाली. त्या धसक्यानं कैक जण बेशुद्ध झाले आणि कैक जण थंडीतापानं आजारी पडले ! रश्श्याची भगोली, भाताचा हंडा आणि भाकरीच्या चवडी तशाच टाकून लोक पळाले. त्यांनीं मागं वळूनदेखील बघितलं नाहीं ...

'भ-भ-भूत ! भ-भ-भूत !' करीत ते जीव घेऊन पळाले. हा प्रकार बघून भाना त्या उघडया रानांत उभा राहून मनःपूर्वक हसला. गेले आठ पंधरा दिवस त्याला केवळ उसाचीं कांडं आणि असल्याच कांहीं सटरफटर वस्तू यांवर आपली भूक भागवावी लागली होती. भाकरीसाठीं तो तडफडत होता. लोक निघून गेले तसं त्यांतलं रश्श्याचं एक भगोलं, काहीं दोनतीन दिवस पुरतील इतक्या भाकऱ्या उचलून तो परत उसाच्या फडांत आला आणि सावकाशपणें जेवला. इतका जेवला कीं तें जेवण त्याच्या हातींपायीं उतरलं आणि गडद झोंप लागली.

आतां मात्र गांवांत या प्रकारानं फारच खळबळ माजली. भान्या भाडुळे भूत झालाय, तो आपल्या मळ्यांत राहातो आणि लोकांना भिवडवतो, ही गोष्ट सत्य झाली. तिच्या खरेखोटेपणाविषयीं कुणालाच शंका राहिली नाहीं. गावांतला हरिबा परीट आपल्या बायकोला म्हणाला,

" अग, आतां धुणं बडवायची आली का पंचाईत ? "

" कां ? काय झालं ? "

" माझा खडक जिथं हाय तिथनं भाडुळ्याचा मळा लई नजीक. मी न्हाई बाबा तिथं जायाचा ! "

" वाड्यांत तेवढ्या जागींच पानी हाय. न जाऊन कसं भागंल ? कापडं धुयाची कुटं ? "

" पेटनात का तीं कापडं ! मी न्हाई जायाचा ! "

" मग पोटाला काय खाल ? "

" बिबं घालीन, पण आपणहून त्या भुताटकींत सापडनार न्हाई ! "

" येडं का खुळं तुम्ही! असं काय करताय लहान पोरावाणी? ध्यादुपारचं कुठं भूत दिसतं का? जावा धुयाला."

गत्यंतरच उरलं नाहीं तेव्हां हरिबा गेला. धुण्याचा बोजा पाठीवर घेऊन पाढऱ्या खडकाला गेला. आजूबाजूला माणूसकाणूस नव्हतं. ओढ्याच्या काठानं एखाददुसरं ढोरदेखील चरत नव्हतं. निळाभोर डोह उन्हाच्या सणक्यानं उकळेल कीं काय असं वाटत होतं. मासे संथ पोहत होते, क्वचित् एखाददुसरा बगळा ओल्या वाळूंत उभा होता. पाठीवरचा बोजा उतरून हरिबा मुकाट्यानं धुणं बडवूं लागला. आजूबाजूला न बघतां, मनांतल्या मनांत रामनामाचा जप करत! खरं तर त्याला खच्चून भीति वाटत होती. त्या भीतीनं त्याचा जीव हलका झाला होता. पण धिटाईनं तो स्वतःची समजूत घालीत होता. जरी भाडुळ्या भाना भूत झाला असला, तरी ध्यादिवसां भूत बघितल्याचा दाखला आजवर नाहीं. बरं, आपण काय त्याचं वाईट केलं आहे म्हणून तो आपल्याला मिवडवील? दगाफटका करील? दुसरी गोष्ट अशी कीं, भूत ओढा ओलांडून पलीकडे येत नाहीं. आपण ओढ्याच्या अलीकडे आहोंत आणि भाडुळ्याचा मळा आहे पलीकडे. मग निर्वेधपणं धुणं धुण्यास हरकत कसली? हात काम करीत होते आणि मन विचार करीत होतं. उघड्या पाठीवर उन्हाचा चपाटा कातड्याच्या बारीक वादीसारखा लागत होता. कपाळावरून घामाचे थेंब पाण्यासारखे ठिबकत होते. आणि बायकोनं भरीस घातलेला हरबा धबाधब धुणं बडवीत होता. आणि मग मागून एकाएकीं आवाज आला,

" काय हरीबा, कसा काय बेत?"

हे शब्द ऐकले मात्र, हरिबानं मागं वळून बघितलं नाहीं. गांवचीं धुणीं ओढ्यावर टाकून लंगोट लावलेल्या अवस्थेतच तो धांपा टाकीत घरीं आला आणि धरणीवर कोसळला! बेशुद्ध झाला. त्याच्या बायकोनं आकान्त केला आणि गांवकऱ्यांच्या नांवानं बोटं मोडलीं,

" अरं, कुणी मंत्र्या न्हाई का? कुणी देवऋषी न्हाई का? कुणी तरी उठा आणि त्या भान्याला बाटलींत बंद करा. त्यानं सगळा गांव पिडला. मेला तो मेला आन् सगळ्या गांवाला तरास देऊं लागला!"

मग चौफेर गांवकरी जमा झाले आणि गंभीरपणानं चर्चा करूं लागले. गांवांत कुणाची हिंमत आहे का, भान्याच्या भुताला कुणी जरब दावील का, याची

चौकशी झाली. पण सर्वांनीं कानांवर हात ठेवले. गांवांतले बारके सारके देवऋषी माना खालीं घालून उभे राहिले. हें जबर भूत हाणायला परगांवचा एकादा नामांकित मंत्र्या आणायला पाहिजे असं त्यांचं मत पडलं. मग असा मंत्र्या कोण ? जो तो आपापल्या परीनं नांवं सुचवूं लागला. तो बेरडसिद्धाचा रामा आणि तो ढालगांवचा तुका, तो बेळंकीचा अमका, तो ढाकरीचा तमका ...

अखेर सर्वांच्या मतानं ठरलं कीं बेळंकीच्या गुरवास बोलवावं !

झालं. सांगून धाडण्यासाठीं माणसं पाठवलीं आणि बेळंकीचा मंत्र्या गुरव गांवांत येऊन हजर झाला. भल्या मोठ्या जबड्याचा आणि तांबारल्या डोळ्यांचा हा इसम दिसायला मोठा उग्रट होता. तो आला तो सात विती घोड्यावर बसून दौडत. लोकांनीं आगतस्वागत केलं. खाऊंपिऊं घातलं. त्या सर्वानं थंड झाल्यावर तो परटाला म्हणाला,

" काय रे, तूं स्वतः बघितलंस नव्हे का भूत ? "

" हां हां, बघितलं. त्याचा आवाज ऐकला — "

" कुठं ? "

" पांढऱ्या खडकावर. "

" किती वेळ होती ? "

" ही आतां आहे तीच. "

" मग चल माझ्याबरोबर आणि दाखव ती जागा. "

त्यासरशीं परीट घाबरला. गयावया करूं लागला.

" दुसरं काय वाटलं तें सांगा : पण मला आतां खवीसाच्या हद्दींत नेऊं नका ! "

" तूं आलं पाहिजेस ! "

" नका नका — "

" अरे, मी असल्यावर तुला भीति कशाची ? तुझ्या केंसाला धक्का लागणार नाहीं ! "

" मला इथं तुमच्या हातानं जिवं मारा वाटल्यास, पण तिकडं नका नेऊं ! "

परटानं अशी हबक खाल्ली होती कीं तो तयारच होईना आणि मंत्र्या त्याला सोडीना. अखेर सगळ्या गांवानं वाटाघाट करून त्याची समजूत घातली. मंत्र्याला घेऊन परीट पांढऱ्या खडकावर गेला. गेला, पण जातांना त्यानं

आजपर्यंत गांवांत झालेल्या सगळ्या कथा मंत्र्याला ऐकवल्या. त्या ऐकून मंत्र्याला घाम फुटला. असला जबरदस्त समंध त्यानं हयातींत बघितला नव्हता.

अखेर दोघेही त्या ठिकाणीं आले. मंत्र्या घोड्याखालीं उतरला. घोडं निघून जाऊं नये म्हणून त्याच्या एका पायाला दोरी लावून ती हातभर मेखेला जखडून टाकली. आणि परटाला विचारलें,

" बोल, दाखव मला तो उसाचा फड ! "

परीट हींव भरल्यासारखा लटलट कांपत होता. तो म्हणाला,

" आतां मला जाऊं द्या. तुमी बघा फडबीड ! "

" छे, छे ! तसं कसं ? तूं शेवटपर्यंत पाहिजेस ! "

" मी भीतीनं मरायला लागलोंय्. "

" तरी जाऊं नकोस. चल फड दाखव ! "

परीट पुढं आणि मंत्र्या मागं चालले. दबकत दबकत, वरचेवर कपाळावरचा घाम पुसत.

ते दोघे असे फडापर्यंत आले आणि एकाएकीं हातांत ऊस घेऊन भाना बाहेर आला. मोठ्यानं म्हणाला, " हरिबा, कुठचा पाव्हणा घेऊन आलास ? "

त्यासरशीं हरिबा धोतर वर करून धूमतकाट गांवाकडे पळाला. मंत्र्या जो जोरानं आला तो टाणकन् उडी टाकून घोड्यावर बसला आणि उगीच उभ्या राहिलेल्या त्या तेज जनावराच्या पुठ्ठयावर त्यानं एक छपाटी उडवून दिली. त्यासरशीं तें चौखूर उधळलं. त्या धसक्यासरशीं दोरीशीं बांधलेली लांकडी मेख उपटून आली आणि मंत्र्याच्या पाठींत धाडकन् बसली. तो भिऊन कळवळला,

" अरं, बाप रं ! "

जसा घोडा उडी घेई तशी मेख पाठींत बसे आणि भीतीनं अर्धमेला झालेला मंत्र्या भूत मागं लागलं म्हणून ओरडे. अशा धोपाट्या खाऊन खाऊन आणि ओरडून ओरडून तो गांवांत येऊन कोसळला, तेव्हां ती दोरी आणि मेख तुटून गेली होती आणि बिचाऱ्याची पाठ सोलून निघाली होती. गांवकऱ्यांनीं विचारलं,–

" काय बुवा, काय झालं ? "

पण बुवाला बोलतांच आलं नाहीं. त्याची वाचाच बंद झाली !

बाहेरची न येतां येतां घरचीं माणसंही मळ्यांत येईनाशीं झालीं; जो तो

भिऊं लागला. तेव्हां भानाची स्थितीही मोठी केविलवाणी झाली. त्या उसाच्या फडांत रानबोक्यासारखं राह्यणं त्याला पटेना. आपल्या बायकोला आपल्या पोरांना बघण्यासाठीं त्याचा जीव तुटूं लागला.

— आणि जिवाचा धडा करून तो एका रात्रीं आपल्या घरीं गेला. गेल्या-बरोबर घरांत भीतीनं सगळ्यांच्या दांतखिळ्या बसल्या. बोट बोट दाढी वाढलेला भाना सगळ्यांना मिठ्या मारूं लागला, तेव्हां कुणी जागच्या जागींच बेशुद्ध होऊन कोसळलं. बाबू भाडुळे घरांतल्या देवापाशीं जाऊन लटलट कांपत उभा राहिला. हें भानाला सहन झालं नाहीं. आपल्याला कुणी ओळखत नाहीं यामुळं त्याला रडूं आलं. बापाचे पाय धरून तो म्हणाला,

" बाबा, मी भूत नव्हे. मी खराच भाना आहें. बघा, माझे पाय उफराटे नाहींत. मी देवाजवळ आलोंय. हें बघा, मी रामसुद्धां म्हणतों. राम-राम-राम-राम. अहो, मी खरोखरच भाना आहें ! " आणि बापाच्या कमरेला वेंघ मारून तो ढसढसा रडूं लागला.

बाबा भाडुळे डोळे गच्च मिटून उभा होता आणि त्याचं अंग थंड पडत चाललं होतं !



---

भारतीय नभोवाणीच्या मुंबई केंद्रावरून वाचलेली कथा. थोडे फेरफार करून.

# सीताराम एकनाथ

अमावास्येच्या काळ्या रात्रीं सुंद्रा माळीण वावटळीसारखी मोठ्या वाड्यांत शिरली. अंगणांतल्या दावणीला डोळे मिटून रवंथ करीत बसलेलीं सीताराम एकनाथचीं चार बैलं तिच्या पायाच्या आवाजानं बुजलीं आणि धडपडून उभीं राहिलीं.

आली तशी पुढचा सोपा, माजघर पार करून सुंद्रा थेट स्वयंपाकघरांत शिरली. समईच्या प्रकाशांत सीताराम एकनाथची म्हातारी आई विरजूं घालीत होती तिच्यापुढं जाऊन उभी राहिली.

चाहुलीसरशीं दचकून म्हातारीनं वर पाहिलं. डोळ्यांना नीट दिसलं नाहीं. तेव्हां बोबड्या शब्दांत विचारलं,

" कोण आहे ? "

सुंद्रा भुतासारखी आणखी एक पाऊल पुढं आली. दोन्ही हातांनीं उचलून आणलेला धोंडा म्हातारीपुढं आदळून ओरडली,

" ह्यो धोंडा घाल माज्या टकुऱ्यांत आन् जीव घे माजा ! "

म्हातारीला कांहींच बोध झाला नाहीं. चमत्कारिक चेहऱ्यानं ती नुसती बघतच राहिली.

" माज्या पोरीचं वाटुळं केलं. मानसातनं उठवली तिला. माज्या भाबडीच्या ध्येनांत आलं न्हाई. माज्या गळ्यांत पडून लेक रडली, ' आई मला दादल्यानं टाकली म्हणून तुज्या आसऱ्याला आलें, आन अशी फसलें. मला भूल पडली ' म्हणून गुरावानी हंबरली. "

सुंद्राचा आवाज बसला होता. संतापानं तिच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा लागल्या होत्या. एखाद्या लहान मुलासारखी ती रडत होती. हातवारे करीत होती. दांतओठ खात होती.

म्हातारी ऐकत होती.

" माज्या पोरीचं वाटुळं केलं. माजी गुनाची बाई. माजं वनवाशी पाखरूं. तिचा तुज्या लेकानं घात केला. धुतल्या तांदळासारखी माजी लेक, तिला डाग लावला. तुज्या काळ्या सापापासनं पोरगी पोटुशी ऱ्हायली. गळ्याला आलं तवा तिनं मला सांगटलं, 'आई मी ईस खाऊन मरतें, आई मी हिरींत जीव देतें...' माजं काळीज हाललं. निम्या रातची उठून व्हरलीणीकडं गेलें, हातापाया पडलें. तिच्या मुड्यावर चाळीस रुपयं घाटलं. आन मिनत्या केल्या, बाई, माज्या लेकीला ह्यातनं मोकळं कर. तिनं मोकळं केलं. म्हातारे, माज्या लेकराच्या पोटावर बकाबक लाथा हाणल्या, बुक्या हाणल्या. गुरावानी वराडली पोरगी आन मग हालहाल होऊन तुज्या पोराचं पाप भायेर पडलं ! "

डोक्याला हात लावून म्हातारी ऐकत होती. तिची मान जास्त हलूं लागली. अन् डोळ्यांना सुंद्रा स्पष्ट दिसेनाशी झाली.

एका झटक्यांत सुंद्रा एवढं बोलली आणि मग तिच्या आवाजाची धार बोथटली. संताप निवला. केवळ दुःख राहिलं. डबडबलेले डोळे आणि ओले गाल पुसून ती समईकडं बघत राहिली, निश्चल.

स्वयंपाकघरांतला उदास काळोख कोपऱ्याकोपऱ्यांत सांचून राहिला होता. ती एवढीशी समई संथ तेवत होती. आवाज कसलाच होत नव्हता.

साठ सुग्या पाहिलेली, इनामदारी सांभाळून करारीपणानं आयुष्याचे शेवटचे दिवस ढकलीत असलेली ती जीर्ण म्हातारी आणि वीस वर्षं रंडकी राहिलेली, दोन लहान धाकटीं पोरं वाढवून धीरानं जगणारी ही म्हातारी !

दोघी समोरासमोर बसल्या होत्या. कांहीं न बोलतां कुठं तरी बघत बसल्या होत्या.

कांहीं क्षण स्तब्धतेंत गेले.

आणि मग सुंद्राचे कोरडे डोळे एकाएकीं पाण्यानं भरले. ओठांची, नाकपुड्यांची हालचाल होऊं लागली. म्हातारीपुढं आदळलेल्या धोंड्यावर तिनं आपलं दळभद्रं कपाळ ताड ताड आपटलं. रक्ताच्या धारा लागल्या.

'अग अग' म्हणून थरथरल्या हातानं म्हातारी अडवूं लागली तेव्हां ती सरदिशीं मागं सरली. उठून उभी राहिली. विलक्षण हातवारे करून म्हणाली,

" कशाला आडवतीस ? कशाला मला आडवतीस ? असल्या पोराला जलम देन्यापरीस वाझुटी का न्हायली न्हाईस ? "

उठली तशी झटक्यानं खालीं बसली. दोन्ही हाताचं पंजे भुईवर आपटून, घासून कडाडली,

" वाटुळं हुईल. सत्यानाश हुईल ग. देव बघून घील ! "

आणि तरातरा निघून गेली ! जशी आली तशीच.

पुढ्यांत ताकादुधाचीं भांडीं घेऊन म्हातारी किती तरी वेळ सुन्न बसून राहिली. आपल्या एकुलत्या एक लेकाची ही कसाबकरणी ऐकून म्हातारीचं सात्विक काळीज विलक्षण तळमळलं. पदरांत एवढी थोरली दौलत होती आणि तिचा धनी हा असा होता. बापाचा केवळ मोठा लौकिक ! त्यानं कधीं कुणाचं फट म्हणून घेतलं नाहीं. मेला तेव्हां सारं चिंचाळं वाड्यापुढं जमून ढसढसा रडलं. एकनाथबाबानं गाव लेकरागत जपला. त्याच्यासारखा माणूस पुन्हा होणार नाहीं म्हणून रडलं. त्या सूर्यापोटीं हा शनी जन्मला. सुंद्रा माळिणीसारखे कैकजणांचे तळतळाट त्याच्या माथीं होते आणि तरीही तो तेंच करीत होता. त्याचं लक्षण खोटं. चिंचाळ्यांतली बरी दिसणारी एक बाई सोडली नाहीं. कुणाच्या जमिनी व्याजांत बळकावल्या. कुणाच्या मोटेचीं चालतीं बैलं सोडून आणून आपल्या गोठ्यांत बांधलीं. कुणाच्या मळ्यांतलीं झाडं तोडून तिसऱ्याच्या जागेंत अरेरावीनं स्वतःचे इमले उठवले ! चिंचाळ्याची उभी रयत त्यानं गांजली. गरीब गांव नाडलं. पिडलं. बापाची पुण्याई, ढीगभर पैका, सरकारदरबारीं वजन, ह्यामुळं मनांतून जळणारं गांव अजून गप्प होतं. पण असं तें किती दिवस गप्प रहाणार ? इतक्या जणांचे तळतळाट माथ्यावर असतांना तो किती दिवस जगणार ? धनदौलत परंपरा कशी जपणार ? इनामदाराच्या घराण्याचा वंशवेल कसा वाढणार ?

म्हातारीनं सुस्कारा सोडला. भुईवर हात टेकून उठत ती बोलली,

" विठ्ठला, बाबा तुझी मर्जी ! "

मग तिनं भांडीं नीट ठेवून दिलीं. चुलीवरचा भात उतरून निखाऱ्याशीं ठेवला. पाट मांडला. तांब्याभांडं भरून ठेवलं.

गांवच्या उचापती उरकून सीताराम एकनाथ घरीं आला आणि हातपाय धुऊन पानावर बसला.

त्याच्याकडं बघत म्हातारी चुलीशेजारीं बसून राहिली.

आख्या चिंचाळयाला गांजणारा सीताराम एकनाथ अंगानं फाटका आणि रंगानं काळा होता. हाडापेरानं लांबार आणि चिवट होता. त्याचा चेहरा उभट होता. डोक्यावरच्या आखुड केसांचा तो उजवीकडं भांग पाडी. तेलकट कपाळावर तांबडया गंधाच्या दोन सणसर रेघा नेहमीं ओढी. त्याच्यामध्यें फुगलेली शीर चमत्कारिक दिसे. चेहऱ्याच्या मानानं त्याचं नाक मोठं होतं. मध्येंच बांक घेऊन तें पार त्याच्या वरच्या ओठावर लोंबकळे. त्याचे ओठ जांभळे काळे होते आणि खालच्या ओठावर एक चिंचोक्याएवढा पांढरा डाग होता.

कसल्या तरी नादांत रंगून तो जेवीत होता. चालण्या बोलण्यासारखं त्याचं जेवणही घाईचं. खालीं वाकून तो भराभर घास घेत होता.

मागचा भात वाढीपर्यंत म्हातारी कांहीं बोलली नाहीं. तो वाढला तेव्हां मग हलक्या आवाजांत बोलली,

"किती जणांचा तळतळाट घेशील शिता! मला म्हातारीला तुझी चांगली वागणूक एकदा बघूं दे कीं. गांवांतल्या चार माणसांनीं तुला चागला म्हटल्याचं ऐकूं दे एकदां!"

सीताराम एकनाथनं मान वर करून बघितलं देखील नाहीं. तो कांहींच बोलला नाहीं. तशी म्हातारी पुढं बोलली,

"सुंद्रा माळीण आली होती आतां."

हें ऐकतांच त्यानं कान टवकारले. त्याची मुद्रा बदलली.

"नवऱ्यानं टाकली म्हणून तिची पोरगी आईच्या आसऱ्याला आली, तिची कशाला पाठ घेतलीस तूं? म्हातारी संतापानं वेडी झालीय्, हाणून बडवून घेतलं तिनं. तळतळाट दिला. काय म्हणावं तुझ्या वागणुकीला! याच पायांत बायकोनं आडांत उडी घेऊन जीव दिला तरी चांगुलपणा येऊं नये तुला?"

यावरही तो कांहीं बोलला नाहीं. भाताचे भराभर घास घेत राहिला. हाताला मीठ चोळून उठला. आंचवून ढेकर देत पुढल्या सोप्यांत गेला.

म्हातारी जेवली नाहीं. वांकल्या पाठीनं आवराआवर, झाकापाक करतां करतां ती आपणाशींच बडबडत राहिली. पुटपुटत राहिली.

हात पाठीशीं घेऊन उघड्या अंगानं सीताराम एकनाथ येरझारा घालूं लागला. सोप्याच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत आंत बडबडणाऱ्या म्हातारीचा आवाज येत होता, पण शब्द कळत नव्हते.

अंगणांतल्या लिंबाच्या काळोखानं माखलेल्या डहाळ्या हालत होत्या. वारा वहात होता. खसपसाट वाढत होता. डोळे मिटून बैलं रंवथ करीत बसलीं होतीं. त्यांतला एक घोरत होता. सोप्याच्या मधोमध टांगलेला कंदील लांब दोरीवर झोंके घेत होता.

सीताराम एकनाथ येरझारा घालत होता. सोप्याच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत.

आतां म्हातारीची झाकपाक झाली होती. माजघरांतल्या जात्यापाशीं तिनं अंथरूण घातलं. भिंतीला टेकून बसून ती हलक्या आवाजांत म्हणूं लागली,

अरे रामराया किती कष्टवीशी
तुझीं पादपद्में कधीं दाखवीशी
तुझ्या भक्तिची हौस मोठी जिवाला
कधीं भेटशी रामराया कृपाळा...

सीताराम एकनाथच्या येरझारा थांबल्या. खुंटीवरचा अंगरखा घेऊन तो बाहेर पडला.

काळोख किट्ट होता. डोळ्यांत बोट घातलं तरी दिसत नव्हतं. पण तशा अंधारांतून सीताराम एकनाथ मांजराच्या डोळ्यानं चालला होता. खेड्याच्या अरुंद गल्लीबोळांतून त्याचीं सराईत पावलं न थटतां ठेचकाळतां बिनचूक पडत होतीं. लिंगड्याच्या वाड्याला वळसा घालून, पाटलाच्या गोठ्यामागून तो आला आणि गोदा वाणीणीच्या दुकानाच्या दारावर थाप टाकून उभा राहिला.

वाणीण विक्रीच्या खोबरेल तेलांत गोडं तेल मिसळीत बसली होती ती चट्कन हालली. आपल्या कर्कश आवाजांत ओरडली,

"कोन हाय त्ये?"

सीताराम एकनाथ खाकरला आणि हळू आवाजांत बोलला,

" अग गोदे, मी आहें. दार उघड ! "

वाणीणीचा जीव खालीं पडला. तिच्या अंगाचा पसारा मोठा होता. भुईला हाताचा नेट देऊन ती उठली आणि बदकासारखी चालत दाराशीं आली.

दार उघडतांच सीताराम एकनाथ पटकन् आंत घुसला. त्यानं दार लावून घेतलं.

गालाला एक बोट लावून वाणीण कुजबुजली, " अग बाय ! इनामदार, असं चोरट्यावाणी कां आज ? "

उत्तरादाखल इनामदार केवळ हसला, तशी वाणीण खूष झाली. तिनं जेनं अंथरलं. तक्क्या झाडला. पानाचा डबा पुढं सरकवला. आणि मग तिच्या ध्यानांत आलं कीं, आज रंग कांहीं वेगळा आहे.

मग तिनंही चेहरा गंभीर केला. आणि विचारलं,

" बोला ना कां ? चिंतागती दिसताया ! "

सीताराम एकनाथनं अंगरख्याच्या खिशांतनं विडी काढली. पेटवली. पेटती काडी फुंकर घालून विझवली.

" गोदा, तुज्याकडं कामगिरी आहे एक. "

" मग सांगा कीं ! " गोदा जवळ सरकली आणि खाजगी आवाजांत बोलली, " कोंडाला घेऊन येऊं का हतं ? "

सीताराम एकनाथनं डोळे मिटले आणि नकारार्थी मान हलवली. विडीचे भराभर झुरके मारले. थोटुक जमिनीवर चुरगाळीत तो गोदीच्या कानापाशीं तोंड नेऊन कुजबुजूं लागला, तेव्हां त्याच्या तोंडांत राहिलेला बाकी धूर बाहेर पडून तिच्या केसावर पसरला.

घंटा दोन घंटा त्यांची कुजबुज चालू होती. मग सीताराम एकनाथ दुकानाच्या बाहेर पडला आणि काळोखांत दिसेनासा झाला.

गोदा वाणीणीनं आपल्या अंगांतली चोळी दातानं ओढून ओढून फाडली. नेसलेलं लुगडं जागोजाग फाडलं. अंगावर बळेंच नखाचे ओरखडे उठवले आणि ती चेटकीणीसारखी बाहेर पडली. सुंद्रा माळिणीच्या घरापाशीं आली.

त्या छोट्या खेडयांत कुणी कुणाच्या ओळखीचं नाहीं असं नव्हतं. गोदाचा आणि साऱ्या गांवाचा परिचय होता. तेलमीठापायीं गावांतल्या प्रत्येक माणसाला तिच्या दुकानांत यावं लागे. कारण चिंचाळ्यांत दुसरं वाण्याचं दुकान नव्हतं. गोदाला सारा गांव ओळखीत होता. सुंद्रा माळिणीचा मवाळ पोरगा शामूही तिला ओळखीत होता.

गांवांत सामसुम झाली होती. सुंद्राच्या घरांत त्या मायलेकी झोपीं गेल्या होत्या का जाग्या होत्या हें कळायला मार्ग नव्हता. त्यांच्या माळीचं कवाड बंद होतं. कदाचित् डोळ्यांतून पाणी गाळीत सुंद्रा घोंगड्यापाशीं तळमळत असेल. कोंडा या अंगावरची त्या अंगावर होऊन उसासे सोडीत असेल. पण बाहेरल्या अंगणांत गुराच्या गोठ्यापाशीं खाटलं टाकून शामू पडला होता. आणि दिवसाभराच्या श्रमानं त्याला गाढ झोप लागली होती. बावीस तेवीस वर्षांचा अबोल आणि बुजरा शामू निवान्त झोपला होता. संतापाच्या भरांत सीताराम एकनाथच्या म्हातारीपाशीं सुंद्रा झाली गोष्ट बोलून गेली होती, पण मग ती कुणापाशींही बोलली नाहीं. पोरीच्या बेअब्रूची गोष्ट चारचौघाच्या कानांवर जाऊन बोलबाला न व्हावा यासाठीं ती जागरूक राहिली. तात्या व्हरलाची बायको आणि इनामदाराची म्हातारी यांखेरीज गोष्ट कुठंच फुटली नाहीं. प्रत्यक्ष शामूलाही तिनं यातलं कांहीं सांगितलं नाहीं. आणि घरांतल्या घडामोडीकडं बारीक लक्ष ठेवण्याइतका शामूही हुषार नव्हता. त्याच्या ध्यानात ही गोष्ट आली. कांहीं तो कधीं तोंडभर बोलत नसे. चार माणसांत मिसळत नसे. सदा गुरं ढोरं, पीक पाणी ह्याच्या उसाभरींत गुंतलेला असे.

गोदा हळू हळू आली. शामूच्या उशाशीं उभी राहिली. हात लावून त्याला हालवत कुजबुजली,

" शामू, ए शामू, शामू ! "

सावध झोपेचा शाम जागा झाला. उठून बसला.

" कोण त्ये ? "

" मी गोदा वाणीण. "

" काय ? "

" गाय सुटलीया माजी. घावना मला. तेवढी बांध. चल ! "

वाणीणीचं दुकान जवळच होतं. ती घरीं एकटीच होती. गाय सुटली, साप निघाला म्हणजे ती रात्रीं अंधारीं येऊन शामूला उठवी.

शामूनं जांभई दिली. पायांत पायताण घालून तो उघडाच गोदाबरोबर गेला. दुकानापाशीं येतांच गोदा म्हणाली,

" दिवा गेला जनू ! "

आणि उंबऱ्यानजीक उभा राहिलेल्या शामूला तिनं नेटानं आंत ढकललं. बाहेरून दार लावून घेऊन कडी घातली. जोरांत बोंब ठोकली.

" चोर दुकानांत शिरला माज्या ! माज्या घरांत चोर शिरला ! आतां काय करूं ग बाई ! "

गोदा ओरड ओरड ओरडली आणि मग पहिल्या झोपेंतनं लोक सावध झाले. राखणदार रामोशी काठ्या, कुऱ्हाडी घेऊन धावले. गोदाच्या दुकानापुढं गर्दी झाली. पाटील, कुळकर्णी ही अधिकारी मंडळीही गोळा झाली. हातांत कंदील आणि सोटा घेऊन सीताराम एकनाथही आला.

गोदा ओरडाओरड करीत होती. थरथर कांपत होती. थयथय नाचत होती.

" गोदा ! " तिला दरडावून सीताराम एकनाथ बोलला, " गप बस आतां. इतकी मंडळी जमलीत आणि आतां भ्यायला काय झालं ? "

गोदा गप झाली.

रामोशांनीं कुऱ्हाडी सरसावून दार रोखलं. त्याच्या भोवतीं बाकीच्या मंडळींनीं कडं केलं. सीताराम एकनाथनं दार ढकलून इशाऱ्यासाठीं हाळी दिली, ' संभाळा ! '

पण उघड्या दारांतून कोणीच बाहेर आलं नाहीं. कांहीं क्षण श्वास रोखून मंडळी उभी होती. पण शिकार बाहेर पडली नाहीं !

सीताराम एकनाथ आंत घुसला. त्यासरशीं रामोशांनींही नेट केलं. खालीं मान घालून भेदरलेल्या भेकरागत कोपऱ्यांत उभा राहिलेल्या चोरावर झेंपा टाकल्या. त्याला बाहेर खेचला.

बाहेर येतांच सीताराम एकनाथनं कंदील वर करून त्याचं तोंड पाहिलं आणि तो आश्चर्यानं बोलला,

" अरेच्या, हा तर सुंद्राचा शामू ! "

मग गडबड झाली. गोंधळ झाला. झोपेंतून जागी झालेली सुंद्रा ऊर बडवीत आली. पांढरी फटक पडलेली कोंडा रडत भेकत आली. रामोशांनीं शामूला काढण्या लावलेल्या पहातांच त्या दोघींनीं आकान्त केला !

सुंद्रा म्हणाली —

" अवं, माजं पोरगं चोरी करायचं न्हाई. अवं, माजं बाळ इचारल्याबगार कुणाच्या रानांतला कांदा उपसत न्हाई ! "

पण तिचं कोण ऐकतो ?

शामूच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा लागल्या होत्या. शरमेनं तो अर्धमेला झाला. त्याला खरी गोष्ट सांगायचंही भान राहिलं नाहीं. गांवकऱ्यांनीं सुंद्रा-कोंडाला समजावून घराकडं पिटाळलं आणि शामूला चावडीच्या खांबाला बांधून घातलं. राखणीला हत्यारबंद रामोशी ठेवले.

मग रीतसर पंचनामा झाला. पोलिसपाटलानं तालुक्याला वर्दी दिली. तिकडून शिपाई आले. शामूला धरून घेऊन गेले.

सुंद्रानं अथरूण धरलं ; हाय खाल्ली. कोंडाच्या अंगांत अगोदरच बारीक ताप होता तो जास्त झाला. आईच्या शेजारीं तिनंही अंथरूण घातलं. दावणीला गुरंढोरं उपाशीं राहिलीं. सुंद्राच्या घरची घडी विस्कटली आणि एके दिवशीं सीताराम एकनाथ तिला भेटायला गेला. त्याला बघताच सुंद्रा भडकून उठली. झाल्या गेल्या प्रकारानं ती खचली होती तरी भडकून उठली. तोंड फिरवून कोंडा धसाधसा रडूं लागली. सीताराम एकनाथकडे तिनं पाहिलंही नाहीं.

सुंद्रा म्हणाली,

" का बाबा माज्या काळजावर डागण्या द्यायला आलास ? "

तेव्हां सीताराम एकनाथ पुढं झाला. म्हातारीच्या अंगावर हात फिरवीत बोलला,

" सुंद्रा ! तू माज्या आईसारखी. वासनेच्या भरांत माणसाच्या हातून होऊं नये त्या चुका होतात. मला माफी कर. "

हें बोलतांना त्याच्या डोळ्याला पाणी आलं. सुंद्राच्या हडकुळ्या पायांवर त्यानं डोकं ठेवलं.

सुंद्राला रडण्याचा जास्त उमाळा आला.

"माजं आल्लाच्या गाईवाणी पोरगं, तें गुन्ह्यांत अडकलं. त्यालाबी कशी बुद्ध झाली. वाणीणीनं कावा केला. तिचं मी काय केलं होतं?"

सीताराम एकनाथ म्हणाला,

"अग, वाणीण नीच बुद्धीची नाहीं. तिला कुणी तरी शिकवलं असंल. तुज्या भावकींतलं कुणी तुझ्या वाईटावर आहे का?"

मुंद्राच्या डोक्यांत नवाच प्रकाश पडला. तिचा हेवादावा करणारी तिची रंडकी भावजय डोळ्यांपुढं उभी राहिली. वाणीणीच्या दुकानांत तपकीर ओढीत ती सदा बसलेली असे.

"व्हय र माज्या लेकरा, ती औदसा बायजा माज्याएकी सदैव जळती. तिला माजं बरं बघवत न्हाई. माजं लेकरूं चार घास सुखानं खातया तें तिला बघवत न्हाई. व्हय रं माज्या लेकरा. तिनंच माजा दावा साधला!"

मुंद्राच्या अर्धवट पिकलेल्या झिंज्या विस्कटल्या होत्या. तोंड वाकडं तिकडं करून बोलतांना तिच्या गळ्याच्या शिरा ताणलेल्या दिसत होत्या. दातवणानं काळे झालेले दात तिनं कराकरा खाल्ले. दोन्ही हातांचे तळवे भुईवर आपटून तळतळाट दिला,

"वाटुळं हुईल. देव बघून घील!"

सीताराम एकनाथ मुंद्रा माळिणीच्या घरांत बराच वेळ बसला आणि उठून आला.

दुसरे दिवशीं तालुक्याला गेला आणि शामूला जामिनावर सोडवून घेऊन गांवीं आला.

मुंद्रा म्हणाली,

"गांवांत माजी इतकी भावकी हुती, पन कुनी माजी इच्यारंपूस केली न्हाई. कामाला आला बामणच!"

मग खटला उभा राहिला. तारखा पडूं लागल्या. खर्चासाठीं पैशाचा तुटवडा पडला. तेव्हां सीताराम एकनाथनं शामूला एकटा गांठून सांगितलं,

"शामू, पैक्याची काळजी करूं नकोस. काय लागतील ते माझ्याकडून घे."

मग त्यानं वरचेवर शामूला हातउसने पैसे दिले. गोड गोड बोलून त्याच्याकडून जमिनीचं खरेदीपत्र करून घेतलं मुंद्राच्या नकळत.

अखेर शेवटीं खटल्याचा निकाल लागला आणि व्हायचं तें झालंच. शामूला सजा झाली. त्याच्या पायांत साखळ्या पडल्या !

सुंद्रा माशासारखी तडफडली. सैराट झाली. कुणा वाटेल त्याला ' तूंच माज्या पोराचं वाटुळं केलंस.' म्हणूं लागली. साऱ्या गांवाला शिव्या देऊं लागली. तुरुंगांत शामूला भेटायला गेल्यावर जेव्हां तिला जमिनीच्या छुप्या खरेदीपत्राची बातमी कळली तेव्हां तर बेफाम झाली. सीताराम एकनाथची सारी करणी सांगून शामूला म्हणाली,

" कसाबा, जिमिन कशी रं इकलीस? अरं! तूं आपल्या आईचा गळा हातानं कापलास. अरं! हें सगळं त्या काळ्याचं काम! त्यानंच गोदाला सांगून तुला साखळ्या अडकावल्या. त्यानंच रं त्यानंच!"

चिंचळ्याला येताक्षणींच तिनं मोठ्या वाड्याच्या पायरीवर हाणून बडवून घेतलं. तोंडांत माती घालून मोठ्यानं बोंब ठोकली !

या गोष्टीला महिना पंधरा दिवस झाले.

तालुक्याच्या गांवाहून सीताराम एकनाथ चिंचळ्याला माघारीं येत होता. वैशाखाची दुपार चावऱ्या कुत्र्यागत अंगाला डसत होती. घामाच्या धारा पुशीत सीताराम एकनाथ लांब लांब टांगा टाकीत होता. चोहीकडं माणदेशांतलं वैराण माळरान पसरलं होतं. झाड नव्हतं. झुडूप नव्हतं. पाखराचा सावट नव्हता कीं माणसाचा वग नव्हता. वळसे घेत गेलेली पाऊलवाट सरतां सरत नव्हती. माळाची लांबड संपतां संपत नव्हती. धोतराचा काचा मारून सीताराम एकनाथ चालला होता. त्याच्या पाठीशीं उपरण्यांत बांधलेलीं केळीं होतीं. उद्यां म्हातारीचा उपास होता म्हणून त्यानं तीं मुद्दाम आणलीं होतीं. म्हातारी फार थकली होती. तिची इच्छा होती कीं, लेकानं पुन्हा लग्न करावं. इस्टेटीचा वारस डोळ्यांनीं बघून ती प्राण सोडणार होती. तिची आतां एकच इच्छा होती. म्हणून सीताराम एकनाथ तालुक्याला गेला होता. एका अडल्या बापाला गटवून आला होता. त्याची मूठ दाबून आला होता. सीताराम एकनाथ एका गरीब आणि सालस पोरीचा नवरा म्हणून पुन्हा मुंडावळ्या बांधणार होता. बोहल्यावर उभा रहाणार होता. म्हातारीला ही बातमी सांगून तो तिचं समाधान करणार होता.

सीताराम एकनाथ उतावळेपणानं लांब लांब टांगा टाकीत होता; पण माळरानांतून सरपटत जाणारी पाऊलवाट सरतां सरत नव्हती. माळ संपतां संपत नव्हता.

आणि मग एकाएकीं सुंद्रा आणि तिची पोरगी कोंडा त्याच्यापुढं येऊन उभीं राहिलीं. वाट अडवून उभीं राहिलीं!

तो जागच्या जागीं थबकला.

म्हाताऱ्या सुन्द्रानं आपलं अप्रं लुगडं खोचलं होतं आणि हडकुळ्या हातांत फरशी कुऱ्हाड. वासल्या डोळ्यांनीं ती बामणाकडं रोखून बघत होती. तापानं पांढरी फटक पडलेली कोंडा हडळीसारखी तिच्या शेजारीं उभी होती. तिच्या हातांत टोंकदार भाला होता!

सीताराम एकनाथ छातीचा जवान होता. तो मुळींच घाबरला नाहीं. लटपटला नाहीं.

कपाळावरचा घाम काळ्या कोटाच्या बाहीनं पुसून आणि उनानं कोरड्या पडलेल्या ओठांवरून जीभ फिरवून तो थोडका हसला. बोलला,

" कोंडे, अग सुन्द्रा! बामणाला आडरानांत गाटून मारतां होय?"

सुन्द्राचा चेहरा काळानिळा झाला. तिचे सुरकुतलेले ओठ वाकडे तिकडे झाले. विलक्षण त्वेषानं ती पचकन् सीताराम एकनाथच्या काळ्या कोटावर थुंकली.

" थू रं थू तुज्या थोबाडावर. अरं सगळ्या चिंचाळ्यानं हातांत बांगड्या भरल्या म्हणून म्या रंडकीनं हातांत कुऱ्हाड घेतली!"

कोंडाचं सगळं अंग थरथरलं. शिरा तटातट फुगल्या.

" बामणा, हागंदरींतल्या डुकरा, तुज्या पापाचा घडा भरला!"

" अग व्हय कोंडे, पण मला अगोदर सांगायचं. माझ्या हातांत निदान साधी काठी द्यायची —"

सीताराम एकनाथचं वाक्य पुरं झालं न झालं तों म्हातारी सुन्द्रा पुढं झाली आणि त्याच्या डोस्क्याचं टिपण साधून तिनं वार टाकला!

त्यासरशीं तो अर्धवट खालीं आला आणि चवताळलेल्या कोंडानं भाला खुपसला!

भाला !

कुऱ्हाड !

कुऱ्हाड !

भाला !

सीताराम एकनाथ गुरासारखा ओरडला. रक्ताच्या चिळकांड्या सरासर उडाल्या. रंगपंचमीच्या चिपळीसारखी एक चिळकांडी कोंडाच्या अंगावर उडाली आणि तिचं विटकं लुगडं लालीलाल झालं !

हातांतला भाला फेकून देऊन ती जोरांत किंचाळली.

सुन्द्रानं कुऱ्हाड टाकली आणि रक्तानें भरलेल्या हातानं पोरीचा हात घट्ट धरून ओरडली,

'पोरी पळ !'

आणि मग त्या वैराण माळरानावर एकमेकीचा हात धरून या मायलेकी सुसाट पळाल्या. सापाला झडपून जाणाऱ्या घारीसारख्या उडाल्या !

जागोजाग भोसकलेला तोडलेला सीताराम एकनाथ रक्ताच्या थारोळ्यांत कांहीं क्षण तडफडला. फडांतल्या पहिलवानासारख्या त्यानं भुईशीं झट्या घेतल्या. खळ्या खांदल्या. पडलेली जागा सोडून तो चांगला सात आठ हात जागेच्या रिंगणांत फिरला. पडल्या पडल्याच सरपटला. पालथा होऊन गुडगेमिठी आला. रक्तानं चिकट झालेल्या मातींत त्यानं नाक, तोंड घुसळलं. दोन्ही हातांच्या पंजांनीं जमीन धरली. नखं बोटं आंत घुसवलीं. आंवळलीं आंवळलीं आणि मग सारा कारभार आटोपला ! खेळ खलास झाला !

